# उषा प्रकाशन, औंध

| | | |
|---|---|---|
| १ जीवन-प्रकाश | पं० सातवळेकर | दोन रुपये |
| २ रातराणीचीं फुलें | श्री० माडखोलकर | सव्वा रुपया |
| ३ ज्वाला | श्री० माधव मनोहर | दीड रुपया |
| ४ लोकहितवादींचीं शतपत्रें | | तीन रुपये |
| ५ नव्या-जुन्या | श्री० ताम्हनकर | दहा आणे |
| ६ सती | श्री० साने गुरुजी | दीड रुपया |
| ७ सात पाकुळ्या | सौ० दया पटवर्धन | दीड रुपया |
| ८ दीपदान | कुसुमावती देशपांडे | सव्वा रुपया |
| ९ त्रिवेणी | श्री० साने गुरुजी | एक रुपया |



# प्रस्तावना

मराठी साहित्यामध्ये 'एकांकी नाटिका' हा अगदी नवीन प्रकार आहे, असें म्हणावयास हरकत नाही. मधूनमधून मासिकपुस्तकांतून एखादी नाटिका वाचावयास मिळते; पण बहुधा ती भाषांतरित असल्याची ग्वाही तिचें वाचन संपतांच वाचकांस मिळते. अलीकडे नभोवाणीसाठी कांही एकांकिका लिहिल्या जात आहेत; पण एकंदरींत एकांकी नाटिकेचा प्रकार अजून मराठी वाङ्मयास पाहुणाच आहे.

या नाटिकांचा विशेष म्हणजे त्या सर्व स्वतंत्र असून, पाश्चात्य कल्पनां-वर आधारलेल्या नाहीत. या नाटिकांचा 'सात पाहुण्या' हा संग्रह प्रसिद्ध करण्याची संधि प्रस्तुत लेखिकेस रा० वसंत श्री० सातवळेकर यांच्या कल्पनेवरून मिळाली. संग्रहांतील सात नाटिकांपैकी शेवटची

'श्रीमंत पतीची राणी' ही नाटिका नवीन लिहिलेली आहे. बाकीच्या नाटिका १९२८ सालापासून १९३८ पर्यंतच्या दहा वर्षांत लिहिलेल्या आहेत. या सातही नाटिका मराठी वाङ्मयांत संग्रहरूपाने प्रथमच पाऊल टाकीत आहेत, एवढ्यावरूनच त्यांच्या संग्रहास 'सात पाहुण्या' हें नांव दिलेलें आहे.

हा नाटिकासंग्रह प्रसिद्ध करण्याचा उद्देश सांगण्यापूर्वी नाटिका प्रथम कोणत्या हेतूने लिहिल्या गेल्या, हें सांगणें आवश्यक आहे. वाङ्मयाचा एक उद्देश म्हणजे वाचकांची करमणूक करणें, हा होय. वाचकांचें व प्रेक्षकांचें मनोरंजन करून त्यांची कांही वेळ करमणूक व्हावी, या हेतूनेच या नाटिका लिहिल्या आहेत. प्रत्यक्ष अनुभवांत कधी एखादा असा गमतीचा आणि चटकदार प्रसंग येतो व तो इतका नाट्यगुणांनी परिपूर्ण असतो की, त्याची एखादी सुंदरशी एकांकी नाटिका बनावी. सर्व नाटिकांच्या मूल कल्पना अशाच साध्या पण विनोदी असून नेहमीच्या व्यवहारांतील प्रसंगांतून त्या निर्माण झालेल्या आहेत.

पाश्चात्य नाटिकांचीं देशी भाषांतरें आपण पुष्कळदा वाचतों; पण परकीय कल्पनांच्या उसनवारीने त्यांच्यांत कित्येकदा जी कृत्रिमता आढळून येते, ती या नाटिकांत दिसून येणार नाही, असा विश्वास वाटतो. वाचकांना या नाटिकांतील प्रसंग कृत्रिम अगर परके वाटणार नाहीत; पात्रें रोजच्या ओळखीच्या माणसांपैकीच कोणी आहेत, असा भास होईल. या नाटिका वाचून होणारी करमणूक, विनोदी प्रसंगांतून आणि पात्रांच्या सहज वागणुकींतून निर्माण झालेली आहे.

प्रत्येक नाटिकेंतील पात्रें वाचकांच्या रोजच्या परिचयाचीं आहेत. तीं ज्या प्रसंगांत सापडलीं आहेत, ते प्रसंगही गमतीचे व वाचकांच्या अनुभवांतील आहेत. वाचकांच्या परिचयाचे कित्येक कॉलेजमित्र

'प्रेमवेडा' मधील वसंतासारखे मित्राच्याच पत्नीवर प्रेम करून फसले असतील. या नाटिकेच्या शेवटापर्यंत वाचक या उल्लू तरुणाच्या प्रेयसीची उत्सुकतेने वाट बघत असतात व शेवटीं ती त्याच्या मित्राची पत्नी ठरते, हें पाहतांच चकित होतात आणि त्या प्रसंगींच्या विनोदाने हसूं लागतात. 'प्रेमाचे पूरक' मधील थट्टेखोर तरुण वाचकांच्या ओळखीचे असतील. तरुण कॉलेज-विद्यार्थ्याला वाटणारी समवयस्क विद्यार्थिनींबद्दलची जिज्ञासा व ओळख करण्याची उत्सुकता कॉलेजांत पाऊल न टाकलेल्यांनाही पटण्यासारखी आहे. आपल्या नवऱ्याचा मोठे-पणा मिरवण्याची स्त्रियांची स्वाभाविक हौस व त्यामुळे निर्माण होणारा गमतीदार प्रसंग 'बंडगार्डनवर' या नाटिकेंत वाचावयास मिळेल. ही नाटिका वाचीत असतां कित्येक वाचकांस आपल्याच बहिणी व जावयाचें कौतुक करणाऱ्या आपल्या आया, यांची आठवण झाल्याशिवाय राहणार नाहीं. 'नीला निमकर' सारखी हट्टी तरुणी, तिचा अविनाश-सारखा लाजाळू मित्र व बाळासाहेब मिरजकरांसारखी हितचिंतक म्हातारी मंडळी कांहीं वाचकांस परकी नाहींत. 'श्रीमंत पतीची राणी' मधील कंटाळलेली शिक्षिका व 'लांबलेलें लग्न' मधील लाडावलेली कुंदा या वाचकांनीं पुष्कळदा पाहिल्या असतील.

अशा प्रकारें सर्व नाटिकांत वाचकांच्या परिचयाचीं पात्रें आपल्या स्वभावविशेषांतून गंमतीचे प्रसंग निर्माण करतात. नाटिकेच्या आरंभीं थोडक्याच वेळांत वाचकांस पात्रांची ओळख होते व त्यांच्यापुढे आलेल्या प्रसंगाची माहिती होते. हे प्रसंग जीवनांत घडून येणाऱ्या विविध घटनांवर आधारलेले आहेत व त्यामुळे त्यांत कृत्रिमता आढळून येणार नाही. नाटिकेच्या आरंभींच वाचकांना निर्माण झालेल्या प्रसंगांत कुतूहल निर्माण होतें व जसजसे ते नाटिका वाचीत जातात, तसतसे नाटिकेंतील प्रसंगांत ते समरस होऊं लागतात. प्रसंगांतून पात्रें कशीं

सुखरूप पार पडतील, या विचाराने ते नाटिकेंतील कथानकाशीं अधिकच एकजीव होऊं लागतात. 'बंडगार्डनवर' नाटिकेच्या पहिल्याच प्रवेशांत वाचकांचा सुशिलेशीं व आई व बहीण यांच्याशीं परिचय होतो. सुशिलेचा नवरा मोटर घेऊन येणार असल्याचें वाचकांस कळतें व पुढे काय होणार, या कुतूहलाने ते नाटिकेकडे आकर्षित होतात. 'श्रीमंत पतीची राणी' या नाटिकेंत प्रथम उषेची नोकरी सुटल्याचें वाचकांस कळतें व श्रीमंत वृद्धाशीं विवाह करण्याचा तिचा निश्चयही समजून येतो आणि वाचक ह्या प्रसंगाचा निकाल काय होतो, हें वाचण्यास उत्सुक होतात. इतर सर्व नाटिकांतही अशा प्रकारें विषय-प्रवेश अल्पावधींत वाचकांस होईल. त्यानंतर या गमतीच्या प्रसंगाचा विकास होत होत वाचक त्याच्या उत्कर्षबिंदूला पोचतात व उत्कंठेने या प्रसंगांतून पात्रें कशीं बाहेर सुटतात, हें पाहण्यास अधीर होतात. प्रत्येक नाटिकेचा शेवट असा आहे की तो वाचल्यावर वाचकांस आनंद व समाधान वाटावें. पश्चात्तापाने पोळलेल्या कुंदेला अखेरीस I. C. S. नवरा मिळतो. गैरसमजाने विरमलेल्या वसंताचें शेवटीं लीलेशीं मीलन होतें. श्यामला वेडा ठरविण्यास निघालेले टवाळ मित्र अखेरीस अनपेक्षित रीतीने त्याच्या प्रेमाचे पूरक बनतात; आणि शेवटच्या क्षणाला उषेचें म्हाताऱ्या बाबासाहेबांशीं ठरलेलें लग्न मोडतें व तिच्यावर प्रेम करणाऱ्या त्यांच्या तरुण मुलाची ती पत्नी बनते.

या नाटिकेंतील बहुतेक पात्रें तरुण व विशेषतः कॉलेजांत शिक्षण घेणारीं आहेत. या पात्रांना अजून आयुष्याच्या गंभीर बाजूची ओळखही नाही. तीं तारुण्याच्या आनंदमय काळांत कॉलेजच्या बेजबाबदार वातावरणांत विहार करीत आहेत. तरुण मनाचा उल्हास, विनोदी स्वभाव, त्यांना वाटणारी तरुण स्त्रियांच्या मैत्रीची उत्सुकता वगैरे स्वभाव-विशेष या पात्रांच्या वागणुकींत व बोलण्याचालण्यांत वेळोवेळीं प्रगट

झालेलं दिसून येतील; पण या अल्लड मंडळींच्या पोरकटपणाबद्दल राग न येतां प्रौढ वाचकांस त्यांच्या लीलांचें कौतुकच वाटेल व त्यांच्या गोष्टी वाचीत असतां थोडा वेळ आपणही तरुण झाल्याचें समाधान त्यांस मिळेल. तरुण वाचकांस या नाटिका वाचीत असतां स्वत:चेंच प्रतिबिंब पहावयास मिळेल व ते सहजच नाटिकेंतील प्रसंगाशीं समरस होऊन जातील, अशी अपेक्षा आहे.

नाटिकांतील पात्रें साधीं, सरळ मनाचीं तरुण मंडळी आहेत. त्यांच्यावर ओढवलेले प्रसंग गंमतीचे, गुंतागुंतीचे पण क्षुल्लक आहेत. हे प्रसंग असे नाहींत की, त्यांच्यापासून अत्यंत गंभीर परिस्थिति निर्माण व्हावी. आणि म्हणूनच या नाटिकांत निर्मळ विनोदाखेरीज कडक टीका कोठेही आढळून येणार नाही. प्रसंग बिकट खरे, पण पात्रांस दुर्दैवाच्या खोल दऱ्यांत कोसळविणारे नाहीत. खेळीमेळीच्या वातावरणांत वावरणारीं, गंमतीच्या व गुंतागुंतीच्या प्रसंगांत सापडलेलीं हीं पात्रें वाचकांस हसवतील, आपल्यावर प्रेम करावयास लावतील; इतकेंच काय, पण आपल्याविषयी काळजी करावयासही लावतील.

या सुखान्तिकांतील पात्रें एका ठराविक साच्याचीं नाहीत, हेंहि वाचकांस दिसून येईल. 'लांबलेलें लग्न' मधील कुंदा, 'श्रीमंत पतीची राणी' मधील उषा, 'नीला निमकर' मधील नीला व 'बंडगार्डनवर' मधील सुशीला यांना एका साच्यांत बसविणें कठीण होईल. पात्रांचे स्वभावविशेष काळजीपूर्वक रंगविले असून, त्यांच्यांत जीवनांत आढळून येणारी व्यक्तिस्वभावांतील विविधता दृष्टीस पडेल. त्याचप्रमाणे एका विशिष्ट वर्गाचा प्रतिनिधि म्हणून एखादें पात्र निर्माण करून त्या वर्गावर टीका केलेलीही कोठे दिसून येणार नाही. 'लांबलेलें लग्न' मधील रावबहादूर, 'गैरसमज' मधील नानासाहेब, किंवा 'श्रीमंत पतीची राणी' मधील दिवटे हीं पात्रें जरी एका विशिष्ट वर्गांतील असलीं, तरी

तीं गौण आहेत व त्यांचा उपयोग मुख्य पात्रांच्या स्वभावपरिपोषाला व कथानकाच्या वाढीला पोषक करण्यापुरताच करण्यांत आलेला आहे.

पात्रें साधीं व नित्य परिचयाचीं असल्यामुळे संवाद व भाषाही सुटसुटीत व रोजच्या व्यवहारांतील आहे. मोठ्या नाटकांत ज्याप्रमाणे पात्रें लांबलांब भाषणें करूं शकतात, त्याप्रमाणे या छोट्या नाटिकेंत चालणें शक्य नाही. त्यामुळे कोणतेंही पात्र बहुधा चारसहा वाक्यांपेक्षा अधिक लांब भाषण एकाच वेळीं करतांना आढळून येणार नाही. काव्यमय, संस्कृतप्रचुर भाषा व क्लिष्ट शब्दप्रयोग यांपेक्षा साधी संभाषणाची भाषा बोलणेंच पात्रांस अधिक स्वाभाविक आहे. त्याचप्रमाणे पात्रें मध्येच गाण्याच्या तानांत स्वतःस गुरफटून घेत नाहीत.

या नाटिकांत कोठेंही मुद्दाम विनोद निर्माण करण्यासाठीं शाब्दिक कोट्या केलेल्या आढळून येणार नाहीत. कित्येक नाटकांत तऱ्हेवाईक रीतीनें वागणारीं पात्रें आपल्या वेडसर बोलण्यानें अगर ठराविक वाक्यांनीं वाचकांचें मनोरंजन करण्याचा प्रयत्न करतात. अशीं पात्रें प्रत्यक्ष सत्यसृष्टींत क्वचितच भेटतात. त्यामुळे तीं ओढूनताणून आणलेलीं आहेत, हें वाचकांच्या नजरेस येतें. आपल्या कृत्रिमतेनें तीं उलट रसभंगच करतात. अशा प्रकारचीं पात्रें या नाटिकांत सापडणार नाहीत.

यानंतर नाटिकांच्या रचनेसंबंधीं थोडेंसें विवेचन करणें अगत्याचें आहे. या नाटिकांना जर एखादा टीकाकार तंत्राचें क्लिष्ट मापन लावूं लागला व परदेशी एकांकी नाटिकेचें संपूर्ण तंत्र तिच्यावर लादूं लागला, तर त्यांत कांही दोष सापडण्याचा संभव आहे. उदाहरणार्थ 'प्रेमवेडा' नाटिकेंतील चौथ्या प्रवेशांतील कंसान्तर्गत सूचना नाट्यतंत्रदृष्ट्या सदोष असल्याचा आरोप होणें शक्य आहे. या ठिकाणीं एक गोष्ट लक्ष्यांत ठेवणें अवश्य आहे. हल्लींच्या परिस्थितींत महाराष्ट्रांत नाट्यकला जवळ जवळ नामशेषच झालेली आहे. आज सिनेमाच्या भरभराटीच्या

काळांत रंगभूमि अगदीच मागे पडली आहे. क्वचितच एखाददुसरी नाटककंपनी रंगभूमीवर नाटकें करीत आहे. मोठ्या नाटकांची ही स्थिति, मग छोट्या एकांकी नाटिकेची किती उपेक्षा होत असेल, याची कल्पना येईल. रंगभूमीच्या या पडत्या काळांत नाटककाराला रंगभूमीचे नियम पाळून नाटिका लिहिणें अपूर्ण वाटणें साहजिकच आहे; कारण आपलें कथानक जरी नाट्यरूपाने लिहिलें असलें, तरी तें प्रत्यक्ष रंगभूमीवर दाखविलें जाईल किंवा नाही, याची वानवाच असते. बहुधा तें वाचक नुसतें खुर्चीवर बसून वाचणार, हीच अपेक्षा एकांकी नाटिकेच्या कर्त्याला असते. त्यामुळे साहजिकच कंसान्तर्गत सूचना अधिक वर्णनात्मक बनतात. रंगभूमीवर त्या अमलांत आणणें किती कठीण आहे, याची कल्पना नाटिकाकारास नसते, असें नव्हे; पण नाटिका जर रंगभूमीवर दाखविण्याची बहुतांशीं आशा नाही, तर रंगभूमीवरील नेपथ्यरचनेच्या अभावीं वाचकांच्या डोळ्यांसमोर प्रसंगाचें चित्र उभें करण्यासाठी अशा कंसान्तर्गत सूचनांचा अवलंब करणें आवश्यक होऊन बसतें.

परंतु जर सुदैवाने कदाचित् नाटिका रंगभूमीवर दाखविण्याची संधि आली, तर या कंसान्तर्गत सूचना सबंध अमलांत आणण्याची बिलकूल जरूर नाही. त्यांतील वर्णनात्मक व रंगभूमीवर दाखवतां येण्यासारखा भाग गाळून पात्रांच्या तोंडच्या एकदोन वाक्यांनी त्याची भरपाई होण्यासारखी आहे.

आता एखादा टीकाकार असाही आक्षेप घेईल की, अशा परिस्थितींत लेखकाने नाटिकेऐवजी लघुकथाच लिहावी; पण कांही प्रसंग नाट्यगुणांनी इतके पूर्ण असतात की, ते लघुकथेच्या वेषांत चांगल्या रीतीने सजविणें कठीण व अयशस्वी ठरतें. कोणत्याही तऱ्हेच्या का होईना, पण संवादरूपांत व नाट्यवेषांतच ते अधिक सुंदर रीतीने रंगवितां येतात. तसेंच, रंगभूमि जरी कितीही हीनावस्थेप्रत पोचली असली, तरी मानवी

मनाला वाटणारी नाटिकांविषयीची आवड नाहीशी होणें शक्य नाही. त्यामुळे नाटकें लिहिणें अजिबात बंद होणें शक्यतेच्या बाहेरचें आहे. परिणाम एवढाच होतो की, रंगभूमीच्या भरभराटीच्या काळांत लिहिल्या जाणाऱ्या नाटिकांपेक्षा ही नाटिका रचनेच्या दृष्टीने जरा वेगळी वाटेल. अशा तऱ्हेची नाटिका लघुकथा व निर्दोष नाटिका, यांच्यामधील एक नवीन प्रकार म्हणून समजण्यास हरकत नाही. तिला सदोष म्हणणेंही योग्य होणार नाही; कारण ती प्रेक्षकांपेक्षा वाचकांसाठीच लिहिलेली असल्याने निर्दोष नाटिकेसारखीच असल्यास अपुरी व निरस वाटण्याचा अधिक संभव आहे.

नाट्य हें रंगभूमीशीं निगडित आहे. शेक्सपिअरचीं नाटकें त्या काळच्या रंगभूमीसाठी लिहिलीं होतीं. तीं रंगभूमीवर पाहण्यासाठीच लिहिलेलीं होतीं व त्या काळची रंगभूमि अगदी प्रथमावस्थेंत होती. हीं नाटकें जर आज नुसतीं वाचलीं तर अपुरीं वाटतात. आजच्या महाराष्ट्रांतील रंगभूमीच्या विशिष्ट परिस्थितींत परदेशी नाटिकांचें तंत्र जसेंच्या तसें जर आम्ही आमच्या एकांकी नाटिकेवर लादूं लागलों, तर तिची स्वाभाविक वाढ खुंटण्याचा संभव आहे. त्यापेक्षा रंगभूमीच्या चालू परिस्थितीला योग्य अशा तऱ्हेच्या नवीन नाटिका निर्माण होणें अधिक महत्त्वाचें आहे. परकीय कल्पना आमच्या देशी वातावरणांत प्रविष्ट करतांना त्या जशाच्या तशा ठेवण्यापेक्षा परिस्थितीला योग्य असे फेरबदल करणें आवश्यक असतें. एकांकी नाटिकेच्या गुणदोषांची परीक्षा करतांना या गोष्टीचा विचार व्हावयास व्हावा. अर्थात् कलात्मक लेखनाचीं इतर तंत्रें नाटिकेस लावणें जरुरीचें आहेच.

शेवटीं नाटिकांचा संग्रह आताच प्रसिद्ध करण्याचें प्रयोजन काय, हें सांगणें अप्रासंगिक होणार नाही, असें वाटतें. आपल्या महाराष्ट्रांत खुद रंगभूमि जरी भरभराटींत नसली, तरी समाजाची नाटकें बघण्याची

आवड अजून नाहीशी झालेली नाही. लांब नाटकें करणें हौशी, नवशिक्या मंडळींस कठीण पडतें; परंतु छोट्या नाटिका उत्सवप्रसंगीं करणें बरेंचसें शक्य असतें. त्यामुळे अर्ध्या-पाऊण तासांत करून दाखविण्याजोग्या संपूर्ण नाटिका अशा प्रसंगीं हव्या असतात. शाळा-कॉलेजांच्या संमेलनप्रसंगीं किंवा एखाद्या उत्सवप्रसंगीं मोठ्या नाटकांतील एखादा प्रवेश करण्यापेक्षा स्वतंत्र, संपूर्ण अशी नाटिकाच प्रेक्षक अधिक पसंत करतात. लेखिकेकडे पुष्कळदा अशा मंडळींनी नाटिकांबद्दल पृच्छा केलेली आहे; पण लेखिकेच्या नाटिका बऱ्याच वर्षांपूर्वी मासिकांतून प्रसिद्ध झालेल्या असल्यामुळे कित्येकदा ते अंक मिळणेंहि आता मुष्किलीचें होतें. तेव्हा जर नाटिकांचा एकत्र संग्रह प्रसिद्ध झाला, तर आमच्या उत्सवप्रसंगीं या हौशी, नाट्यप्रेमी मंडळींची बरीच अडचण दूर होईल, अशी लेखिकेची समजूत झाली. आमच्या बालमंडळींत नाट्याची आवड उत्पन्न करणें व तिला उत्तेजन देणें अगत्याचें आहे. त्यांत जर आज या कलेची आवड उत्पन्न झाली, तर तीच मंडळी पुढे आज मरणद्वारीं पडलेल्या नाट्यकलेला कदाचित् जिवंत करतील. बालमंडळीप्रमाणेच प्रौढ, हौशी मंडळींनी जर उत्सवप्रसंगीं नाटयप्रयोग करण्याचें चालू ठेवलें, तर समाजांत नाटयप्रेमाची ज्योत मंदपणेंच का होईना, पण तेवत राहील.

वर वर्णन केलेल्या कारणांसाठीं 'सात पाहुण्या' हा नाटिकासंग्रह प्रसिद्ध होत आहे. त्यामध्ये प्रसिद्धीची हौस बिलकुल नाही व कधीतरी लिहिलेल्या जुन्या नाटिका वाचकांच्या गळ्यांत बांधण्याचा उद्देशहि नाही.

संग्रह-प्रसिद्धीचें दुसरें कारण मागे लिहिलें आहेच. रंगभूमीवर केलेले नाट्यप्रयोग बघण्याची हौस असणाऱ्या, पण आजच्या परिस्थितींत नुसत्या त्यांच्या वाचनावरच समाधान मानणाऱ्या नाट्यप्रेमी वाचकांसाठीहि हा संग्रह प्रसिद्ध होत आहे. या नाटिका वाचून जर

कोणास रंगभूमीचें पुनरुज्जीवन करण्याची इच्छा झाली, तर 'सात पाडुण्या' फारच भाग्यवान् ठरतील. 'सात पाडुण्या' हा संग्रह प्रेक्षक, वाचक व टीकाकार यांच्या अवलोकनासाठी ठेविला आहे व मंडळी त्याचा योग्य परामर्ष घेतील, अशी आशा आहे.

रा० वसंत श्री० सातवळेकर यांनी प्रकाशनाचें काम अत्यंत तत्परतेने, सुबकपणें व अल्पावधींत पूर्ण केलें आहे तें वाचकांच्या पसंतीस उतरेल, अशी खात्री वाटते.



# अनुक्रमणिका







## प्रवेश पहिला

(दोन खणांची एक छोटी खोली. भिंतींना पांढरा सफेत रंग दिलेला असून त्यांवर तऱ्हतऱ्हेच्या सुंदर स्त्रियांचीं कॅलेंडरें विराजमान झालेलीं आहेत. उजव्या हाताकडील भिंतीला टेकून एक कॉट ठेवलेली आहे. जवळच एक लहानसें टेबल व खुर्ची समोरासमोर तोंड करून उभीं आहेत. टेबलावरील पुस्तकें अस्ताव्यस्त पद्धतीने पसरलेलीं असून, खुर्चीवर एक टॉवेल लोंबत आहे. शेल्फवरील थोडींशीं पुस्तकेंसुद्धा उसकलेलीं दिसत असून, खालच्याच फळीवर हॅझेलिन स्नो, पोमेड वगैरे अत्यावश्यक जिनसांच्या बाटल्या ठेवलेल्या आहेत. कॉटवर भिंतीला पाठ टेकून, एक पाय लांब पसरून फिकट चेहऱ्याचा वसंत पडला आहे. त्याने आपला उजवा हात एखाद्या हताश माणसाप्रमाणे आपल्या केसाळ डोक्यावर टेकला आहे, त्यावरून त्याच्यावर कसलातरी कठीण प्रसंग ओढवलेला असावा असें स्पष्ट होत आहे.)

**वसंत**— (दारावरील टिचक्या ऐकून चिडक्या स्वरांत) कोण आहे ?

**बाहेरून**— (थट्टेच्या स्वरांत) चोर आहे चोर !

(वसंत उठतो, धोतराचा सोगा सावरीत दारापाशी जातो व कडी काढतो.)

**वसंत**— (प्रभाकराला पाहून हास्यमुखाने चष्मा नीट करीत) ओहोहो ! कोण प्रभाकर का ? Welcome! यावें महाराज, आपलीच—

( प्रभाकर ताड्कन् दार लोटून खोलींत शिरतो व हसत हसत वसंताच्या पाठीवर थाप मारतो. त्याचें वय चोवीस पंचवीसपेक्षा जास्त नसून, पोषाक एखाद्या 'कॉलेज स्टूडंट' ला शोभण्यासारखाच आहे. )

**वसंत**— ( प्रभाकराचा हात ओढून त्याला खुर्चीवर बसवीत ) बसावें म्हटलें महाराज !

**प्रभाकर**— ( टोपी टेबलावर ठेवून रुमालाने चेहरा पुशीत ) काय रे गृहस्था, असा दारें लावूनसा बसतोस ? वाचीत होतास कीं काय ?

**वसंत**— ( एकदम चेहरा हिरमुसला करून ) अरे बाबा, कसलं वाचन नी कसलं काय ?

**प्रभाकर**— ( हसून ) म्हणजे ? असा अगदी निराश कां झालास ?

**वसंत**— ( एक खोल निश्वास टाकून ) हं !

**प्रभाकर**— ( त्याच्या पाठीवर थाप मारून ) वा रे वा! तूं तर आता दुःखोद्गार काढूं लागलास !

**वसंत**— ( गंभीर स्वरांत ) काय सांगूं तुला प्रभाकर ?

**प्रभाकर**— ( रुमालाने वारा घेत ) काय बुवा, झालंय् तरी काय तुला आज ? ऐकूं दे तरी !

**वसंत**— ( गंभीरपणें ) प्रभाकर, ही थट्टेची वेळ नव्हे !

**प्रभाकर**— ( हसून ) अं ? काय एवढा कसला दुःखाचा प्रसंग ओढवला आहे चंबूसारखीं तोंडं करून बसायला ?

**वसंत**— प्रभाकर—

**प्रभाकर**— काय ?

**वसंत**— प्रभाकर, माझं मन माझ्या ताब्यांत राहिलेलं नाही.

**प्रभाकर**— ( हसत ) म्हणजे ? तूंही या प्रेमपिशाचाच्या पाशांत अडकलास कीं काय ?

**वसंत**— कां ? तूं आपला लग्न करून मोकळा झालास म्हणून होय ?

**प्रभाकर**— लग्नाचा अन् प्रेमाचा काय बुवा संबंध ?

**वसंत**— वाहवा रे गृहस्था ! फुकट बी. ए. झालास !

**प्रभाकर**— ( हसत ) बरं तें राहूं दे तूर्त ! पण ही रंभा आहेतरी कुठली की जिनं तुझं मन हिरावून नेलं आहे ?

**वसंत**— ( एक खोल निश्वास टाकून ) आहे एक अशीच !

**प्रभाकर**— अरे, पण अशीच म्हणजे काय ? नीट नांव गाव सांगेशील कीं नाही ? मी कांही तिला पळवून नेणार नाही !

**वसंत**— ( चाचरत ) अरे, ती—ती—मला तिचं नांव नाही बुवा ठाऊक !

**प्रभाकर**—शाबास पठ्या ! नांवही ठाऊक नाही अन् तिच्यावर प्रेम करायला निघाला !

**वसंत**— मी तिला दोनचारदाच पाहिली, पण तेव्हापासून मला तिच्याशिवाय कांहीही सुचेनासं झालं आहे !

**प्रभाकर**— असं कां ? बरं, ही तुझी 'प्रिया' केवढी, कशी, कुठली आहे, तें तरी कळूं दे. रूपाने—

**वसंत**— ( डोळे मिटून ) अहाहा ! काय तें सौंदर्य ! ती हरणासारखी चंचल दृष्टि, पोवळ्यासारखे ओठ, तो गोड हसरा चेहरा, ते कपाळावर नाचणारे केस—

**प्रभाकर**— वा ! तूं तर अगदी तिच्यावर बेहद्द खूष झालेला दिसतो आहेस ! बरं, पण या बाईसाहेब आहेत केवढ्या ?

**वसंत**— फार मोठी नाही रे? फार तर सोळा नाही तर सतरा—

**प्रभाकर**— ( भिवया वक्र करून ) वास् ?

**वसंत**—( कपाळाला आठ्या चढवून ) म्हणजे? तुला काय वाटलं ती पंचवीस वर्षांची आहे ?

**प्रभाकर**— ( हास्याचे मजले चढवीत ) ओ हो हो हो ! इतक्यांत रागही येऊं लागला अं ? बरं, पण ही तुझी प्रिया राहते तरी कुठे ?

**वसंत**— ( हताश स्वरांत ) मला कसली मिळते ती ?

**प्रभाकर**— कां बुवा ? इतका हताश कां झालास ? तुझ्यासारखा नवरा मिळण्याइतकं तिचं दैव बलवत्तर नाही होय ?

**वसंत**— तसं नाही रे बाबा ! पण ती मला मिळणार कशी ?

**प्रभाकर**—अगदीच hopeless आहेस बुवा तूं ! रोमान्स करायाचा तर इतका भित्रेपणा काय उपयोगी ? अरे, माझ्यासारखा मदतनीस असल्यावर ती तुझी व्हायला काय उशीर ?

**वसंत**— (आशाळभूत नजरेने त्याच्याकडे पहात ) काय बुवा ? कसा मिळवणार तूं तिला ?

**प्रभाकर**— अरे, आधी मला तिला पाहूं दे. मग सांगतों सगळं कसकसं नी काय काय करायचं तें !

**वसंत**—( एकदम उठून ) आत्ता येतोस ?

**प्रभाकर**—( मान डोलवून ) वाहवारे पठ्ठया ! मला आत्ता डॉक्टरकडे जायचंय् औषध आणायला !

**वसंत** — कुणासाठी रे ? राणीसाहेब इतक्यांत आजारी पडल्या कीं काय ?

**प्रभाकर**— बा ! राणीसाहेब इकडे कुठल्या ? त्या बसल्या आहेत तिकडे कोकणची हवा खात ! सध्या दुसरी खोली मिळेस्तवर मी मावशी-कडेच आहें हें विसरलास वाटतं? आमची मावशी जरा आजारी आहे. बाकी या प्रेमज्वराने तुझी मेमरीहि नाहीशी झालीसं दिसतं खरं !

**वसंत**— अरे, मी तिला पाह्यलीहि नाहीं; मला काय ठाऊक ती घरीं आहे कीं नाही तें ? तुझ्या इथे त्या दिवशीं एक तरुण मुलगी ओझ-रती पाहिली, तेव्हा मला वाटलं—

**प्रभाकर**— शाबास गृहस्था ! ती तर माझी मावसबहीण !

**वसंत**— हो का ? I am sorry. मला काय माहीत !

**प्रभाकर**— बरं, मग कधी जायचं ?

**वसंत**— कुठं ? तिच्याकडे ?

**प्रभाकर**— कडे म्हणजे ? ओळखही केलीस कीं काय इतक्यांत ?

**वसंत**— नाही रे ! कडे म्हणजे I mean तिच्या बाजूला ! ती गॅलरींत उभी असतेच. आपण जरा समोरच्याच हॉटेलांत—

**प्रभाकर**—( त्याच्या हातावर टाळी मारून ) वाहवा ! उत्तम कल्पना—

**वसंत**—तर तर ! तसा आहेच मी सुपीक डोक्याचा ! बरं, मग उद्या येशील ?

**प्रभाकर**— उद्या नाही बुवा— परवा जाऊं ।

**वसंत**—हें रे काय ? एकेक दिवस लांबणीवर टाकूं लागलास तूं तर—

**प्रभाकर**— अरे,आता एका दिवसानं काय होणार आहे ? (रिस्टवॉच-मध्ये पाहून ) बापरे, साडेसहा झाले ! जातों. मी आता ! येतोस का तूं !

**वसंत**— आत्ता ?

**प्रभाकर**— अरे, चल बेट्या जरासा बाहेर! अष्टौ प्रहर विचार करून थोडीच ती मिळायची आहे?

**वसंत**— तसं नाही रे! बरं चल. (कोटाची बाही हातांत चढवूं लागतो, तोंच कसलीतरी आठवण झाल्यासारखें करून) वा! तुला चहा द्यायचा अजिबातच विसरलों मी आज. सांगू का चहा करायला—

**प्रभाकर**—(परत खुर्चीवर बसत) करूं ना म्हणजे? वा! केलाच पाहिजे. मी केव्हाची वाट पहातों आहे की हा आत्ता चहा आणील, मग चहा आणील; पण तुला तर 'तिने' इतकं कमालीचं वेड लावलं आहे की तूं साध्या गोष्टीहि विसरूं लागला आहेस!

**वसंत**— हो हो! इतका जर चहा हवाच होता, तर आधी सांगितलं कां नाहींस?

**प्रभाकर**— वा! खासा न्याय! बरं, पण मला उशीर होतो आहे त्याची काय वाट? चहा आणतोस का जाऊं? (उठण्याचा आव आणतो.)

**वसंत**—(प्रभाकराला खुर्चीवर बसवून) थांब थांब! आत्ता आणवतों. कमू, ए कमू— कमू! कुठे गेली कोण जाणे!

**प्रभाकर**— अरे, तूंच खाली जाऊन सांग म्हणजे झालं.

(वसंत दार उघडून जिना उतरतो. प्रभाकर खिडकींत उभा राहून रस्त्याची शोभा पाहूं लागतो.)

**वसंत**—(थोड्या वेळाने दोन हातांत दोन चहाचे पेले घेऊन येतो.) बघ प्रभाकर! दोन मिनिटांत चहा तयार! (टेबलावर चहाचे पेले ठेवतो.)

**प्रभाकर**—(खुर्चीवर बसून पेला तोंडाला लावीत) म्हणजे? खाली चहाच चालला होता वाटतं?

**वसंत**—(हसत) नाही रे! आईनं मघाशीच तुला वर येतांना

पाहिलं, तेंव्हाच शेगडीवर चहाचं आधण ठेवून दिलं होतं. ती आता चहा न्यायला हाक मारणारच होती मला !

**प्रभाकर**— ( चहा पीत ) बरं, मग वसंत, परवाच्या दिवशीं—

**वसंत**— परवाच्या दिवशीं जायचं ठरलं हं !

**प्रभाकर**— ( चहा संपवून रुमालाने तोंड पुशीत ) ठीक आहे ! पण आटप बाबा आता. (घड्याळांत पहात ) ओ ! It's past seven!(खुर्चीवरून उठून ) वसंत, चल. ऊठ आता.

( वसंत चहाचा शेवटचा घोट घेतो व कोटटोपी चढवून प्रभाकराबरोबर बाहेर पडतो.)

---

## प्रवेश दुसरा

( सायंकाळीं चारचा सुमार. प्रभाकर इझिचेअरवर 'यशवन्त' चा अंक चाळीत पडला आहे. जवळच्याच राउंड टेबलावर एक अर्धवट उघडलेली सिगारेट बॉक्स पडलेली असून, त्याच्याच शेजारीं एक जाडेंजुडें कायद्याचें पुस्तक स्वस्थपणें झोप घेत पडलें आहे.वसंताच्या खोलीपेक्षाही प्रभाकराची खोली जास्त अव्यवास्थित आहे.)

**प्रभाकर**— (पोस्टमनचा शब्द ऐकतांच दचकून उठून) पत्र आलं वाटतं ? ( आरामखुर्चीवरून उठून दारापाशी जाऊं लागतो, तोंच एक सतराअठरा वर्षांची तरुण मुलगी हातांत पत्र घेऊन प्रवेश करते. तिला पाहून ) इंदे, कुणाचं ग पत्र ?

**इंदू**—(पत्र लपवून गालांतल्या गालांत हसत ) कुणाचं आहे ओळख पाहूं ?

**प्रभाकर**— मला नाही येत ओळखतां !

**इंदू**— ( हसत ) आहा ! काय पण भोळेपणाचा आव आणतोस तरी ! कुणाला वाटेल- पण मी नाहीं हो फसायची ! कालपासून कोणाच्या

पत्राची वाट पहात होतास, तें काय मला समजत नाही ?

**प्रभाकर**— ( आश्चर्याचा आविर्भाव आणून ) कुणाच्या पत्राची वाट पहात होतों बुवा मी ?

**इंदू**— हो–हो तर ! जसा कांही आपण त्या गावचाच नाही ! ( पत्र पदराखालून काढून ) वहिनींचं असलं तर काय देशील बक्षीस ?

**प्रभाकर**— पण वहिनींचं असणं शक्यच नाही मुळी !

**इंदू**— अन् असलं तर ?

**प्रभाकर**— ( तिच्या हातांतून पत्र ओढून घेऊन ) अग वेडे पोरी, नाही म्हणून सांगतों ना ? ( लिफाफा फोडून वाचूं लागतो. )

**इंदू**— ( उत्सुकतेने त्याच्या चेहऱ्याकडे पहाते; परंतु त्याच्या चेहऱ्यावर आनंदाची छटाहि न दिसल्याने आश्चर्याने ) कुणाचं रे पत्र ?

**प्रभाकर**— ( पत्र लिफाफ्यांत घालीत ) कांही नाही ग ! बाबांचंच आहे.

**इंदू**— हात्तिच्या ! आज जरा उशीरच झाला चहाला नाही ? हो ! नाही तर उद्या म्हणशील की चार दिवस मावशीकडं गेलों तर वेळेवर चहाही नाही मिळाला !

**प्रभाकर**—( हसत ) तर तर ! खरंच इंदे, मी एक खोली पाहिली आहे. तेव्हा पंधरा तारखेपासून तिकडंच जाईन म्हणतों. आता अभ्यासाला सुरवात केली पाहिजे !

**इंदू**— ( रागावून ) हो ! आणखी आठ दिवस मी इथं आहें, तोंवर राहिलास तर काय बिघडेल अगदी ?

**प्रभाकर**— ( हसून ) तसं नाही ग ! पण—

**इंदु**— नाहीतरी वहिनी थोडीच आहे तिथं ! ती आहे मुळी

कोकणांत ! खरंच प्रभाकर, तूं आता बिऱ्हाडच कर ना ?

**प्रभाकर**— ( हसत ) शाबास ! म्हणजे मी यंदा नक्की नापास होणार !

**इंदू**— इश्श ! नापास का ! आम्ही नव्हतं का केलं बिऱ्हाड त्यांची परीक्षा पास व्हायच्याआधी !

**प्रभाकर**— अग बाई, तुझे 'ते' आहेत हुषार ! माझ्यासारखे ढ नाहीत !

**इंदू**—तर तर ! खरंच वाटेल कुणाला ! खरंच, पण चहा आणायचा राहिलाच ! ( स्वयंपाकघराकडे धावते. )

**प्रभाकर**— ( पुन्हा खुर्चीवर बसूं लागतो. इतक्यांत वसन्ताला पाहून उठून ) यावं वसन्तराव ! बसा इथं खुर्चीवर ! ( हसून ) तुझीच वाट पहात होतों.

**वसंत**— (खुर्चीवर बसत ) खरं ?

**प्रभाकर**— बरं, पण ह्या वेळेला इकडं कोणीकडं ?

**वसंत**— (टेबलावरील अंक ओढून ) तुझ्याकडंच !

**प्रभाकर**— ( हसत ) होय ? ( इतक्यांत इंदू चहाचा पेला घेऊन येते, तिला पाहून ) इंदू, आणखी एक पेला आणतेस का ? ( इंदू जाते. )

**वसंत** —( अंक खाली ठेऊन ) अरे, तुला उद्याची आठवण द्यायला आलों. म्हटलं विसरायचास एखादा !

**प्रभाकर**—(त्याच्या पाठीवर थाप मारून ) शाबास राव ! अरे, पण मी विसरेन कसा ? ( इंदू चहाचा पेला आणते व प्रभाकराच्या हातांत देऊन जाते.) हं वसंत, घे तो चहा !

**वसंत**—( चहाचा पेला हातांत घेऊन ) प्रभाकर, उद्या पांचला माझ्या घरीं येशील ना ?

**प्रभाकर**—(मोठ्याने हसत) अरे हो गृहस्था! तू तर जाण्याशिवाय बात नाही करीत!

**वसंत**—(चहा संपवीत) एकदा लवकर होऊन गेलं म्हणजे बरं.

**प्रभाकर**—(चहाचा पेला ओठाला लावून) अरे, पण—

**वसंत**—(पेला खाली ठेऊन रुमालाने तोंड पुशीत) प्रभाकर, माझी काय स्थिति झाली आहे, तें सांगणं शक्य नाही.

**प्रभाकर**—(मिस्किलपणें हसून) खरं?

**वसंत**— ही हसण्याची का वेळ आहे प्रभाकर?

**प्रभाकर**— मग काय रडण्याची आहे?

**वसंत**— प्रभाकर?

**प्रभाकर**— काय वसंत?

**वसंत**— तुला नीट बोलायचं आहे कीं मी जाऊं?

**प्रभाकर**— कमाल आहे बुवा तुझी! अगदी रडकुंडीला की रे आलास! (रुमाल तोंडाला लावून हसूं लागतो.)

**वसन्त**—(दुःखाने) तुला काय दुसऱ्याची परवा? आपलं झालंय् लग्न—

**प्रभाकर**—(मोठ्याने हसत) असं?

(वसंत रागाने उठतो व खोलीबाहेर चालता होतो.)

**प्रभाकर**—(त्याच्यामागे पळत) वसंत, अरे रागावलास का? अरे ये. मी उगीच तुझी थट्टा केली! (वसंत नाहीसा झालेला पाहून परत फिरत,) काय बुवा प्राणी आहे तरी! पक्कं वेड लावलेलं दिसतंय् त्या रंभेनं! (खुर्चीवर जाऊन बसतो, इतक्यांत इंदू येते.)

**इंदू**— ( हसत ) काय रे, इतक्यांत गेलाही तो ?

**प्रभाकर**— ( हसून ) अग, तुला काल सांगितलं ना, तोच हा ! अगदीच चिडका झाला आहे या प्रेमज्वरानं !

**इंदू**— तूं तरी त्याला अगदी चिडवायलाच लागलास, मग काय करावं त्यानं ?

**प्रभाकर**— साहजिकच आहे ! तुलाहि असंच वेड लावलं होतं, मनोहरपंतांनी— नाही ?

**इंदू**— ( मुरका मारून ) इश्श् ! हें रे काय, प्रभाकर ? ( निघून जाते. )

---

## प्रवेश तिसरा

( वसंताची खोली. वसंत टॉवेलने तोंड पुशीत साबणाची डबी हातांत घेऊन प्रवेश करतो. खोलींत शिरल्याबरोबर दार लावून घ्यावयाला तो विसरत नाही. नंतर आरशासमोर उभा राहून टॉवेलाने चेहेरा पुसल्यावर तोंड वळवून तीनतीनदा तो स्वच्छ झाला आहे किंवा नाही, तें पाहतो. जवळच्याच स्टुलावरील पोमेडच्या बाटलींतील बरेंचसें पोमेड डोक्याला चोपडल्यावर ब्रशाने केस उलटे फिरवितो. चेहेऱ्याचें प्रतिबिंब आंत पडेल, इतके गुळगुळीत केस झाल्यावर ब्रश खाली ठेवतो.नंतर व्हॅझेलिन स्नोच्या बाटलींतील स्नो चेहेऱ्याला चोपडल्यावर त्याच्या घमघमाटाने खूष होऊन त्याच्या चेहेऱ्यावर स्मित झळकल्याशिवाय रहात नाही. )

**वसंत**— ( चेहेरा तीनतीनदा वळवून, आरशांत पहात केसांवरून हात फिरवीत, सस्मित ) ठीक ! आता केसबीस तर नीट बसले ! चला, आता. आधी तो धोब्याकडून आणलेला शर्ट चढवावा. त्या बेट्याच्या मागे लागलों

नसतों सारखा, तर कुठला मिळाला असता शर्ट! (टेबलावर घडी करून ठेवलेला शर्ट उचलतो व तो नाकाशीं धरून नुकत्याच शिंपडलेल्या सेंटचा सुवास येत आहे किंवा नाही, तें पाहिल्यावर) वा! काय वास येतो आहे पण! (अंगांतील शर्ट काढून, पोलो कॉलरचा शर्ट अंगांत चढवीत, हसत) पोषाखाची इतकी काळजी मी जन्मांतही कधी घेतली नसेल! (शर्टला सोन्याचीं बटणें लावल्यावर हॅंगरवरील ब्ल्यू सर्जचा कोट चढवीत) इस्त्रीबिस्त्री तर ग्रॅंड झाली आहे! गुड्, (आरशांत स्वतःला पायापासून डोक्यापर्यंत न्याहाळून पहात) आता कांही कमतरता राहिलीसं नाही वाटत! (दचकून) खरंच, आज सकाळीं त्या पोराकडून बुटांना पॉलिश केलं खरं; पण तें नीट तरी झालं आहे का? (एक बूट हातांत घेऊन) वा! यांत तर माझा चेहेराही स्वच्छ दिसतो आहे! बरं, वाजले किती? (टेबलावर काढून ठेवलेल्या रिस्टवॉचमध्ये पाहून) हात्त्याच्या! चारच वाजले वाटतं! अजून तब्बल तास आहेनी काय! अन् हा प्रभाकर तर पांचाच्या मागूनच येईल; पण आधी नाही यायचा! (खिडकींत जाऊन रस्त्याकडे पाहतो व परत फिरतो.) आता करावं तरी काय? बसतों कांहीतरी वाचीत. बाकी वाचण्याकडे माझं कसलं लक्ष्य लागतं म्हणा? (खुर्चीवर बसतो व एक कादंबरी वाचण्याचा प्रयत्न करतो. इतक्यांत दारावर टिचक्या वाजल्याचा आवाज ऐकून दार उघडण्यास धावतो; पण दार उघडल्यावरोबर कोणीच नाहींसें पाहून निराशेने) अं! भासच झाला वाटतं! (पुनः पूर्ववत् वाचीत बसतो; पण त्याचें लक्ष्य वाचनाकडे मुळीच लागत नाही. कांहीं वेळाने जिन्यावर पावलांचा धाड् धाड् ध्वनि ऐकूं येतो. तो ऐकून दारापाशी जातो. दार उघडतांच एक पांचसहा वर्षांची गोजिरवाणी मुलगी दिसते. तिला पाहून कपाळाला आठ्या चढवून) काय ग कमू, इकडे कशाला आलीस?

**कमू**— (त्याच्याकडे तिरक्या नजरेने पहात लडिवाळपणें) एऽ दाऽदाऽ—

**वसंत**— हं, लवकर सांग काय सांगायचं तें!

**कमू**— दाऽदाऽ—

**वसंत**— तुला लवकर सांगायचं असलं तर सांग नाही तर जा एकदाची!

**कमू**— (त्याला बिलगून त्याच्या चेहऱ्याकडे पहात) दादा, तूं कुठं चालला आहेस?

**वसंत**— (कपाळला आठ्या चढवून) कां?

**कमू**— अं अं! मला नेतोस तुझ्याबरोबर?

**वसंत**— (एकदम तिचे हात सोडवून) छे, छे! मला बाहेर जायचं आहे खूप लांब! तुला नाही नेतां यायचं!

**कमू**— (हिरमुसल्या चेहऱ्याने) असं रे काय दादा? मी तुला त्रास नाही द्यायची!

**वसंत**— छे—छे! तें कांही नाही. तूं आईबरोबर देवाला जा! मला कॉलेजांत जायचं आहे.

**कमू**— मग मी आलें तर काय होईल?

**वसंत**— आमचे प्रोफेसर तुला नी तुझ्याबरोबर मलाही मारतील!

(कमू निरुपायाने जिन्याकडे वळते. ती जातांच सुटकेचा एक निश्वास टाकून वसंत मागे वळतो. कांही वेळ खिडकींत उभा राहून रस्त्याकडे पाहतो. पण कोणीच न दिसल्याने निराश होऊन परत खुर्चीवर बसतो. पांच एक मिनिटांनी दारावर टिचक्या ऐकूं येतांच वसंत धावतच दारापाशी जातो. प्रभाकराला पाहतांच उड्या मारीत म्हणतो—) आलास का एकदाचा! प्रभाकर, केंव्हाची तुझी वाट पाहतों आहें.

**प्रभाकर**— ( त्याला पायापासून डोक्यापर्यंत न्याहाळून पाहिल्यावर हास्याच्या हवेल्या उठवीत ) वाहवा! वसंत, आज तूं तर औरच थाट केला आहेस.

**वसंत**— अन् प्रभाकर, तूं आज जरा तो नवा कोट घातला असतास तर?

**प्रभाकर**— ( हसत ) अरे बाबा, आता मला कोण पाहणार आहे? माझं झालंय् लग्न! आता तुझ्यासारख्यांनीच थाट करायचे, समजलास?

**वसंत**— अरे, पण जरा कांही—

**प्रभाकर**— कां बुवा? तुझ्याबरोबर यायला हा ड्रेस शोभणार नाही कीं काय?

**वसंत**— तसं नाही रे. बरं! चल आता! निघायचं ना?

**प्रभाकर**— ( भिवया वर चढवून ) इतक्यांत?

**वसंत**— म्हणजे? आता काय तुझा बेत आहे? तें कांही नाही! आता उशीर उपयोगी नाही. निघालंच पाहिजे. मग आल्यावर पाहिजे तर दोन तास बस नी दोन पेले चहा ढोस!

**प्रभाकर**— तें तर झालंच रे! चहाच काय, पण पेढे काढीन पेढे!

**वसंत**— अरे, ती मला मिळूं तर दे, मग लाडू देईन बरं!

**प्रभाकर**— ओहो! मोठंच सांगितलंस! बरं, चल तर मग.

( वसंत एकदा आरशांत पाहतो. प्रभाकर त्याची थट्टा करतो. वसंत टेबलावरील सुवासिक रुमालाची घडी खिशांत वर दिसेल अशी अलगद ठेवतो व डोक्यावर नवी फरकॅप चढवतो. पायांत स्लीपर्स चढविल्यावर दाराला कडी लावून तो जिना उतरूं लागतो. प्रभाकरही त्याच्यामागे जातो. दुसऱ्या मजल्यावर येतांच ' आई, जातों ग ,' असें सांगून उत्तराची वाटहि न पाहतां तो व प्रभाकर तडक रस्त्यावर उतरतात. )

---

## प्रवेश चवथा

( एक गजबजलेला रस्ता. अपटुडेट पोषाख केलेला वसंत व त्याचा मित्र प्रभाकर एका चाळीकडे पहात फिरत आहेत. सारखें वर पाहणें बरें दिसणार नाही, असें वाटून ते लवकरच समोरच्याच एका हॉटेलांत शिरतात व खिडकी-जवळच्या राऊंड टेबलाजवळ बसल्यावर चहा केक्सची ऑर्डर देतात. परंतु त्यांचें लक्ष समोरच्या चाळीकडेच आहे. )

**वसंत—** ( बोटाने दाखवीत ) अरे, हीच ती समोरची चाळ! दुसऱ्या मजल्यावरच्या गॅलरींतच मी तिला पाहिली होती.

**प्रभाकर—** कोणती ? ही चाळ ? अरे, इथंच आमचा एक चुलत मामेसासरा रहातो. बऱ्याच दिवसांमागं मी एकदा तिकडं गेलों होतोंहि.

**वसंत—** ( आनंदाने ) हो का ? Then so much the better ! जर ती नाहीच दिसली लवकर, तर मग आपण तुझ्या त्या सासऱ्याकडं जाऊं नी तिथून—

**प्रभाकर—** ( हसत ) Of course !

**वसंत—** पण आज ती अजून कां नाही बुवा दिसत ? कदाचित् गॅलरीवरचे कपडे काढायला येईल—

**प्रभाकर—** (त्याच्या पाठीवर थाप मारून ) काय उतावळा आहेस बुवा ! अरे दिसेल ती ! इतका अधीर होऊं नकोस—

**वसंत—** अधीर नाही रे. पण—

**प्रभाकर—** हं वसंत ! चहा आला—

( वसंत चहाचा पेला तोंडाला लावून समोर पाहतो. )

**प्रभाकर—** चहा सांडेल, अन् पेलाही फुटेल बरं का !

**वसंत—** नाही रे ! पण अजून कां नाही येत ती ?

**प्रभाकर**— तूं झाला आहेस उतावीळ, अन् म्हणूनच ती दिसत नाही! (इतक्यांत कोणीतरी त्याच्या पाठीवर थाप मारतें, त्यामुळे दचकून–) कोण ? गुप्ते का ?

**गुप्ते**— काय प्रभाकर! अरे, लक्ष कुठं होतं ? केव्हाचा हाका मारतोंय् मी!

**प्रभाकर**— (वसंताकडे पहात) तसं नाही रे! सहज तिकडे—

**गुप्ते**— (जवळच्याच खुर्चीवर बसत) काय रे, तूं कुठं राहतोस ? तुझ्या जुन्या खोलींत चौकशी केली, तर तूं ती बदललीस म्हणून कळलं.

**प्रभाकर**— मी सध्या मावशीकडंच आहें.

(प्रभाकर वसंताकडे पाहतो, त्याचा त्रासलेला चेहरा पाहून प्रभाकराला हसूं आल्याशिवाय रहात नाही.)

**प्रभाकर**— हो. चहा– वगैरे झाला का ?

**गुप्ते**— हो. चहा घेतल्यावरच बाहेर पडत होतों, तोंच तूं दिसलास. म्हणूनच तर थांबलों. (इतक्यांत रस्त्यावर त्याला एक मित्र दिसतो, त्याला पाहून उठतो.) अरेच्या, हा पहा दामले चालला आहे. (प्रभाकराचा हात हातांत घेऊन) अच्छा प्रभाकर, आता पुन्हा कधी भेटणार ?

**प्रभाकर**— (उभा राहून त्याचे हात आपल्या हातांत घेत) तुझ्याकडंच येईन मी पुन्हा—

**गुप्ते**— ठीक आहे. माझा पत्ता माहीत आहेच तुला. (एकदम) खरंच. विसरलोंच. Let me congratulate you. तुझ्या लग्नाला येणार होतोंच, पण—

**प्रभाकर**—पण, काय झालं ?

**गुप्ते**— अरे, मध्येच कल्याणला जावं लागलं! (घाईने) बरं, जातों

मी आता. तो दामले गेलासुद्धा—( धावत जातो. )

**वसंत**—( सुटकेचा एक निश्वास टाकून ) गेली एकदाची पीडा ! म्हटलं ही ब्याद आणखी किती तास गप्पा मारणार आहे कोण जाणे !

**प्रभाकर**— वसंत, हें रे काय ? अजून तुझ्या रंभेचें दर्शनही होत नाही ?

**वसंत**— ( निराशेने ) काय बुवा ! ( इतक्यांत गॅलरीकडे पाहतो व हर्षाने उडी मारून उठतो. ) प्रभाकर, ( प्रभाकर दचकून त्याच्याकडे पाहतो. ) अरे गद्ध्या, लवकर पहा, ती बघ बाहेर आली.

**प्रभाकर**—(समोरच्या गॅलरीकडे पाहतो. गॅलरीच्या रेलिंगजला हाताचीं कोपरें टेकून उभ्या असलेल्या एका सोळा सतरा वर्षांच्या मुलीला पाहून एकदम उठून उभा रहातो व वसंताचे हात धरून आश्चर्याने ओरडतो. ) वसंत, वसंत, म्हणतोस तरी काय हें ! ही मुलगी ?

**वसंत**— ( आपल्या 'प्रिये' च्या अप्रतिम लावण्यानेच ह्याची अशी स्थिति झाली असेल असें वाटून आनंदाने ) होय प्रभाकर, हीच ती ! कशी सुंदर—

**प्रभाकर**— ( रागाने डोळे फिरवून त्याच्या पाठीवर एक गुद्दा देत ) लोकांच्या बायकांच्या सौंदर्याचं मिटक्या मारून वर्णन करायला लाज नाही वाटत ? —हरामखोरा —!

**वसंत**— ( भीतीने थरथर कापत ) अरे, झालं तरी काय ? कुणाच्या बायकोचं ?

**प्रभाकर**— हरामखोर ! कुणाची बायको म्हणून विचारतोस का वर !

( इतक्यांत त्याची दृष्टि वर गॅलरीकडे जाते. तोंच ' ती ' लाजऱ्या चेहऱ्याने आंत पळतांना दिसते. एकदोन क्षणांतच डोक्याला टोपी चढवून एक मध्यम वयाचे गृहस्थ गॅलरींत येतात व समोरच्या हॉटेलाकडे पाहून हसत चाळीचा जिना उतरतात. ते जवळ येतांच प्रभाकर सौम्य चेहरा धारण करतो. )

**गृहस्थ**— ( हॉटेलांत येऊन प्रभाकराला नम्रपणें नमस्कार करीत, हसत ) नमस्कार, प्रभाकरपंत ! अहो, तुमच्या जुन्या खोलींत जाऊन किती शोध केला, पण तुमचा पत्ता लागेना—

**प्रभाकर**—( हसण्याचा प्रयत्न करीत ) हो. मी खोली बदलली आहे. सध्या मावशीकडंच आहें आठ दहा दिवस—

**गृहस्थ**— ( हसत ) असं का ? आम्हांला कांहीच पत्ता लागेना. म्हटलं तुम्ही इथं आहांत कीं नाशकाला घरीं गेला ! आमच्या मुलीचं लग्न एकदम ठरलं, तेंव्हा तार करूनच मालतीला बोलावलं कोकणांतून ! तिला येऊन आज आठ दिवस झाले बघा, पण तुम्हांला कळवतां येईना— बरं, झालं तें झालं. आता इथे हॉटेलांत काय उभं रहायचं ? चला, आमच्या घरीं चला— अकस्मात् गाठ पडली म्हणून बरं झालं ! हंऽहंऽहं !

( प्रभाकराचा हात धरून त्याला आपल्याबरोबर नेतात. प्रभाकर एकदा आसपास पाहतो, पण वसंताने केंव्हाच सूंबाल्या ठोकल्याचें त्याच्या दृष्टीस पडते ! )

---

एप्रिल १९२९

# प्रवेश पहिला

( कॉलेजमधील स्त्रियांसाठी राखून ठेवलेली खास खोली. मधली सुट्टी झाल्या-मुळे खोलीच्या आंत व बाहेर विलक्षण गलबला चालू आहे, कॉलेजची स्थापना व्हावयाच्या वेळीं असणाऱ्या तुरळक दोनतीन मुलींना ऐसपैस पुरेशी असणारी ती खोली आजच्या वाढत्या स्त्रीशिक्षणाच्या काळांत अपुरी भासत होती. कित्येक मुली खुर्चींवर बसल्या आहेत, कोणी उभ्याच आहेत. दोघीजणी पिंगपाँगचा समाचार घेत आहेत. कांहीजणी कॅरम खेळत आहेत. कॉलेजच्या नाविन्यपूर्ण विस्तीर्ण क्षेत्रांत पाऊल घालणाऱ्या चौघीपांचजणी नोटीसबोर्डपाशींच रेंगाळत आहेत. इतक्यांत हास्यविनोदाचा कलकलाट ऐकूं येतो. धाड्कन् दरवाजा उघडला जातो, व तीन मुली मोठमोठ्याने हसत एकमेकींच्या अंगावर आदळत आंत शिरतात. या तिघींनीहि पांढरीं पातळें परिधान केलीं आहेत. पोषाख सारखाच आहे; बाकी रूपांत फरक आहेच.

ह्या तिघींमध्ये एकदम मनांत भरण्यासारखी म्हणजे कुंदाच आहे. तिचा चेहरा उभट असून वर्ण गौर आहे. हसून हसून आता त्याच्यावर लाली पसरली आहे ही गोष्ट वेगळी. डोळे मोठे व हसरे आहेत. पण तिच्या चेहऱ्यावर कोठेहि बुद्धिमत्तेचें तेज दिसत नाही. कधीहि खोल विचार न करणाऱ्या लोकांपैकीच ती एक आहे, असें तिच्या डोळ्यांवरून व वागण्याच्या तऱ्हेवरून कोणाच्याहि तत्काळ लक्षांत आलें असतें. तिचें बोलणें बरेच लाडिकपणाचें असून आपल्या स्वरूपा-

विषयीं तिची बरीच मोठी कल्पना असावी असें तिच्या स्वतःकडे व स्वतःच्या पोषाखाकडेच लक्ष पुरविण्याच्या सवयीवरून दिसतें. )

**कुंदा—** लीले, शर्थ आहे बाई तुमची ! माझी कोण त्रेधा उडाली, नि तुम्हांला असं अचरटपणानं हसायला कांहीच कसं वाटलं नाही ग ?

**शांता—** ( हसून हसून बाहेर आलेलें डोळयांतील पाणी रुमालाने पुशीत ) हसायला येईल नाही तर ग काय, कुंदा ? काय ग बाई तरी ! ( पुन्हा हसू लागते. )

**कुंदा—** पुरे पुरे ! हसून हसून काय मरायचं आहे वाटतं ?

**तारा—** ( लीलेकडे पाहून ) पण काय ग लीले, असं कसं ग तो एकदम म्हणाला ?

( तारेच्या बोलण्याने दुसरी एक मुलगी तेथे येते व 'काय झालं' म्हणून उत्सुकतेने विचारते. पण तिच्याकडे लक्ष द्यायला कोणालाच फुरसत नाही ! )

**कुंदा—** ( लटक्या रागाने कपाळावर आठ्या चढवीत ) हं, आता त्याची पुनरावृत्ति नकोय् म्हटलं !

**तारा—** इश्श ! अन् आपण लायब्ररींत पुस्तक वाचायला गेलों ना, तेव्हा तो देसाई मला तिकडून लांबून येतांना दिसला ग ! कुंदेला बघतांच हसला की आपला ! आणि मी तर कित्तिक वेळां त्याला आपल्या तासाला आलेला पाहिला आहे. हा पडला बी. ए. तला. ह्याचं ग काय काम असतं आपल्या क्लासांत ?

**लीला—** अग, काम कसलं ? मुद्दाम फाजीलपणाच करायचा मुळी ! पण खरंच, काय ग म्हणाला तो मघाशीं ?

**तारा—** हात्तिच्या. मग ऐकलंस तरी काय तूं इतका वेळ ?

**लीला—** अग, तसं कळलं मला; पण नीट Wording नाही बाई समजलं.

**तारा—** मग ऐक आता ! अग, त्यानं कुंदेनं मागितलेलं पुस्तक काढलं; आणि तें तिच्या हातांत ठेवतांना कसं म्हणाला, "So you are Miss Kale ? I am so glad to make your acquaintance."

**लीला—** इश्श ! चावट कुठला ! असा फाजीलपणा करायला हवा, म्हणूनच हा सेक्रेटरी झाला वाटतं ? अन् कुंदे, तुझ्या नादानंच आम्ही त्याला मंत दिलं बरं का !

**कुंदा—** (गाल फुगवून लाडिक स्वरांत) इश्श, मला काय मेलं माहीत हा असा आहे म्हणून ! आमचा दादा म्हणाला, 'दे त्याला मत !' म्हणून दिलं मी.

**तारा—** (हातांतील रुमालाचा चोळामोळा करीत) खरंच बाई, ह्या मुलांना काय वाटतं— आपण मूर्ख आहोंत म्हणून ?

**कुंदा—** (कपाळाला आठ्या घालून) कुणाला माहीत काय वाटतं तें ! अन् काय ग लीले, तो एक मुलगा पाह्यलास का, सारखा तास चालू असतांना आपल्याकडे बघत असतो तो—?

**तारा—** (उत्सुकतेने) कुठला ग ? तो पुढल्या रांगेंतला ना ?

**कुंदा—** हो, तोच. अस्सा राग येतो मेल्याचा !

**लीला—** अग, मग प्रिन्सिपालकडे कां नाही तूं जात ?

**कुंदा—** तर काय ! पाहीन पाहीन, नाही तर जाईनच शेवटीं. ह्यांची मेल्यांची अशीच जिरवली पाहिजे !

**तारा—** (कुंदेकडे पाहून) बाकी कुंदे, हा देसाई मात्र इतका फाजील असेलसं नव्हतं वाटलं बाई ! किती सभ्य दिसतो तोंडावरून !

**लीला—** अन् म्हणे बी. ए. चा स्कॉलर !

**कुंदा**— ( कुत्सितपणें ) मुलींशीं फाजीलपणा करण्याबद्दलच ह्याला ही स्कॉलरशिप् मिळते वाटतं ?

**तारा**— कुंदे, आता परत जाऊंच नकोस आपली तूं त्याच्याकडे लायब्ररींत. फाजीलपणानं बोलायचा पुन्हा कांही तरी.

**लीला**— वा ग वा ! म्हणजे काय? त्याच्यासाठी हिनं लायब्ररीचा advantage घालवायचा वाटतं ?

**कुंदा**— जळूं दे मेली ती लायब्ररी ! तुझं आपलं कांहीच्या बाहीच बोलणं. लीले, मी नाही बाई पुन्हा पाऊल घालायची त्या लायब्ररींत, तो सेक्रेटरी आहे तोंवर !

**लीला**— पण मग पुस्तक कसं मिळणार ?

**कुंदा**— न का मिळेना !

**तारा**— नाही तरी तिला कुठं मोठं वाचन करून त्याच्यासारखी स्कॉलरशिप् मिळवायची आहे !

**कुंदा**— ( तोऱ्याने ) तर काय ! आम्हांला ग काय करायची आहे career. नोकरी थोडीच करायची आहे? जेमतेम पास झालों, म्हणजे झालं —

(इतक्यांत घंटेचा आवाज ऐकूं येतो; सर्व लगबगीने उठतात व वह्या शोधूं लागतात.)

**कुंदा**— (जांभई देत) काय ग, जायचं का तासाला ?

**लीला**— जाऊं दे ! आता कांही नाहीच सुचायचं नाही तरी—

**तारा**— अन् त्यांतनं तें दिवेकरांचं लंबाण ! मला तर वर्गांत काय चाललं आहे, हें पण अजून माहीत नाही !

**कुंदा**— अन् इथं कुणाला माहीत आहे ?

**लीला**— चला मग घरीं.

**तारा**— हं! चल, कुंद. (तिघीहि उठतात.)

---

## प्रवेश दुसरा

(संध्याकाळीं चार वाजण्याचा सुमार—कॉलेजसमोरील रस्ता. नुकताच पाऊस पडून गेलेला असल्याने सर्वत्र चिखलाचें साम्राज्य पसरलें आहे. पांचसहा मुलींचा एक घोळका त्या चिखलांतून वाट काढीत हातांतील पुस्तकें व पदर त्यांना सांभाळीत मोठ्या मुष्किलीने चालला आहे. बाकी वाऱ्याने फडफडणारे त्यांचे रंगीबेरंगी पदर मोठे आकर्षणीय दिसत आहेत खरे!)

**त्या घोळक्यांतील एक**— (एका interesting विषयाला चालना देण्याच्या हेतूने) बघितलीत ना ग आजची गंमत? काय तें हसणं अन् काय तें खिदळणं! कशाला मेली सीमाच नाही मुळी!

**दुसरी एक**— (मान उडवून) हो! कुंदा अन् तिचं सर्कल ना? भारीच बाई फाजीलपणा मांडला आहे त्यांनी आताशा!

**आणखी एक**— (त्या दोघींच्या बोलण्याने जोर येऊन)—त्यांना काय वाटतं कोण जाणे! आज मधल्या सुट्टींत त्या मोठमोठ्यानं हसताखिदळत बसल्या होत्या ना—म्हणून मी आपलं सहज विचारलं 'काय झालं' म्हणून! पण त्यांना नुसतं उत्तरदिखील देववलं नाही.

**एक नवीनच आवाज**— (हसत हसत) अग, त्या होत्या आपल्यांतच गर्क! तुला उत्तर द्यायला तिथं फुरसत तरी होती का त्यांना?

**पांचवी—** बाई, बाई, बाई ! अन् कुंदाच्या कौतुकाशिवाय तर ह्यांना विषयच नाही मला वाटतं बोलायला. सारा वेळ आपलं पहावं तेव्हा 'कुंदा–कुंदा' चाललेलं असतं !

**पहिली—** (ह्या विषयाला मूळ चालना देणारी, व्याजोक्तिपूर्ण स्वरांत) हो ! तें तर विचारायलाच नको ! काय म्हणे, 'कुंदा, आज तू भारीच सुंदर दिसते आहेस !—कुंदा, तुला पांढरं पातळ कित्ती शोभतं !' सदान् कदा तेंच !

**दुसरी—** अन् काय ग, ह्यांना काय वाटतं, सगळीं मुलं काय ह्यांच्या-मागं आहेत म्हणून ?

**तिसरी—** हो, नेहमी आपल्या ह्यांच्या असल्या तक्रारी ! काय म्हणे, आज तो मुलगा माझ्याकडे पहात होता, उद्या त्यानं माझ्याकडे पाहून smile च केलं ! पण मी म्हणतें, आमच्याकडे पाहून नाही ग कुणी हसत ? ह्यांच्याच कशीं सगळीं मागं लागतात ? ह्यांचेच चाळे असले असतात मुळी !

**चवथी—** हो ! आजहि कांहीतरी 'देसाई देसाई' म्हणून चाललं होतं बाई !

**पांचवी—** बाकी तो देसाई मात्र चांगला आहे, बरं का !

**चवथी—** अग, पण ह्यांनी त्याच्यावर तरी तोंड सोडायला थोडंच कमी केलं आहे !

**पहिली—**(आश्चर्यानें) म्हणजे ? देसाईनं काय केलंन् ह्यांचं ? मला माहीत आहे तो— चांगला स्कॉलर मुलगा आहे तो. त्याला वेळ तरी आहे का ह्यांच्यामागं जायला !

**पहिली**— अग, पण त्या इतका विचार कशाला करताहेत? स्कॉलर काय, अन् डलर्ड काय, सगळे ह्यांना सारखेच! सगळे ह्यांच्यामागं लागतात!

**तिसरी**— बाकी त्यामुळं कुंदा मात्र फार चढली आहे बरं का, आताशा! आपल्या फ्रेंड्सशिवाय इतर कुणापाशी तोंड उघडील तर शपथ!

**दुसरी**— हो! तिला तर वाटतं, की आपण अप्सराच आहोंत कॉलेजांत अवतरलेल्या!

**पहिली**— तर काय! काय तीं रोजचीं बदलणारीं पातळं, तऱ्हतऱ्हेचीं ब्लाउझेस्, नि नवेनवे सफाईदार अंबाडे! काय नखरा करते रोज!

**दुसरी**— बाकी मला वाटतं, कुंदा तशी भोळी आहे ग!

**तिसरी**— भोळी कसली!

**चवथी**— भोळी म्हणजे काय, जरा मूर्खच म्हणेनास! तशी त्या शान्ता किंवा लीला ह्यांच्यासारखी स्वभावानं द्वाड नाही ती! पण ह्यांनी मात्र भारीच चढवून ठेवली आहे तिला!

**पहिली**— तें कांही असो! पण ती फारच चढली आहे, यांत कांही शंका नाही!

**दुसरी**— पडेल एखाद दिवशीं तेव्हा कळेल मग!

**तिसरी**— पडेल तेव्हा पडेल! सध्या तर बाईसाहेब अगदी ब्यूटीच्या सिंहासनावर विराजमान झाल्यासारख्या दिसताहेत!

**( इतक्यांत एक मोटार हॉर्नचा शंख करीत त्या मुलींना दूर होण्याची सूचना देण्यासाठी उभी रहाते. एकजण एकदम दचकून मागे पहाते व हळूच म्हणते, "अग ए, गप्प बसा! कुंदा—" त्या एकदम शांत होतात व बाजूला होतात.**

कुंदा त्यांच्याकडे पाहून स्मित करते. ह्या तें परत करतात. कुंदेची मोटार निघून जाते.)

**एकजण**— बाई ग! ऐकलंन् कीं काय कोण जाणे!

**बाकीच्या**— कुणाला माहिती! बाकी पुरे झाला हा आता टॉपिक्! पुन्हा आणखी कुणी तिच्या फ्रेंडस् दिसायच्या.

(सर्वजणी दुसऱ्याच कोठल्यातरी विषयावर बोलत मार्गक्रमण करूं लागतात.)

---

## प्रवेश तिसरा

(कुंदेचें घर. कुंदेच्या खोलींत कुंदा हातांत एक पुस्तक घेऊन उभी आहे. तिच्यासमोरच कुंदेचा 'दादा' मनोहर उभा आहे. कुंदेच्या चेहऱ्यावर असंतोषाची छाया दिसत आहे.)

**मनोहर**— (विनवणीच्या स्वरांत) कुंदे, इतका काय आग्रह घेतेस? चल लवकर, बाहेर देसाई वाट पहात आहे— चल ना? किती वेळ एखाद्याला तिष्ठत ठेवायचं?

**कुंदा**—(कपाळाला आठ्या चढवून) हें रे काय हें दादा? कित्तीदा सांगितलं तरी तुझं आपलं तेंच! मी नाहीं येत.

**मनोहर**— पण कुंदे, तूंच विचार करून बघ. त्यांत आहे काय एवढं? 'डेक्कन असोसिएशन्'चा तो सेक्रेटरी आहे. 'मेंबर व्हाल का?' म्हणून विचारायला आला आहे तो. त्यांत काय 'हार्म' आहे? चल लवकर. नुसते चार शब्द बोलायचे.

**कुंदा**—(फुरगटून) मी नाहीं बाई येत! हा काय मेला त्रास? सांग त्याला मी घरीं नाहीं म्हणून.

**मनोहर**— असं काय करतेस वेड्यासारखी? तो आला, तेव्हा तूं खिडकींत उभी होतीस. त्यानं तुला पाहिलं नाही, असं थोडंच आहे!

**कुंदा** – (चिडक्या स्वरांत) हा रे काय मेला फाजीलपणा त्याचा? मला नाही बाई असलं पाचकळपणा आवडत. भारीच लोचट आहे नाही तरी तो. तासचे तास व्हरांड्यांत उभं राहून मुलांशीं गोष्टी करणं कांही कांही मुलींसारखं मला बाई पसंत नाही पडायचं. सगळींजणं हसतात, अन् पुन्हा आपलंहि नांव वाईट होतं! इतरांचं कांही असो म्हणा, पण निदान मलातरी कॉलेजांत असं आपलं नांव वाईट करून घ्यायचं नाहीय्!

**मनोहर**—(वाईट वाटून) कुंदे, कुंदे! असं नको बोलूंस! देसाई तसा कांही फाजील मुलगा नाही. चांगला सभ्य, हुशार विद्यार्थी आहे तो. माझ्या ओळखीचा आहे ना तो? उगीच भलत्याशीं बोलायचा मी तरी कसा आग्रह करीन तुला?

**कुंदा**—(मान उडवून) हो, हो! ठाऊक आहे मला मोठा चांगला आहे तो. त्या दिवशींची लायब्ररींतली गंमत सांगितली नाही का तुला?

**मनोहर**— मग त्यांत काय झालं? त्यांत कुठला गैरशिस्तपणा केला त्यानं?

**कुंदा**— हो, फार चांगल्या manners आहेत त्याच्या! हें असं वागणं शोभतं वाटतं त्याला?

**मनोहर**— मला नाही त्यांत आचरटपणा दिसत कुठं!

**कुंदा**— (तिरस्काराने) हो, तुला नाहीच दिसायचा !

**मनोहर**— पण कुंदा, तूंच विचार कर. तुम्ही मुलांच्या कॉलेजांत जातां, अन् मग इतके conservative विचार तुम्हांला शोभतात का? co-education तर हवं–मग co-education मुळं उत्पन्न होणारी परिस्थिति नको का पत्करायला ?

**कुंदा**— (चिडून) पुरे, पुरे ! तुझं लेक्चर ऐकायला कांही मी इथं उभी नाहीं आहें. मला नाही त्याच्याशीं बोलायचं ! मग काय म्हणतोस ?

**मनोहर**— (अजूनहि शान्तपणें) पण कां ? कारण तर सांगशील कीं नाही ? का उगीचच आपली डोक्यांत राख घालून घ्यायची ? तूं मला दाखवून दे की, देसाई वाईट आहे–मी आपलं म्हणण लागलीच मागं घेईन.

**कुंदा**— (चिडक्या स्वरांत) माझं नाही कांही अडलं तुझी समजूत करायला ! तो देसाई चांगला असो, नाहीतर वाईट असो ! मला कांही त्याच्याशीं बोलायचं नाही. माझं आपलं त्याच्याविषयी वाईट impression झालं आहे. अन् तें तूं कितीहि सांगितलंस तरी बदलायचं नाही ! मग तूं मला कांहीहि म्हण. अन् नाही तरी मला कॉलेजांतल्या मुलांशीं गप्पा मारणं मुळीच पसंत नाही !

**मनोहर**— (रागावून) बरं, बरं ! समजलं, बाईसाहेब ! तोहि इतका कांही तुझ्याशीं बोलायला सुकला नाही आहे– ! तूं जें जें बोललीस तें तें जाऊन सांगतों. कळूं दे तरी त्याला एकदा तुझा स्वभाव ! फार high opinion आहे तुझ्याविषयी त्याचं; उतरूं दे एकदा खाली.

**कुंदा**— (पुस्तक वाचण्याचें ढोंग करीत) खुश्शाल सांग ! मला मुळीच परवा नाही त्याच्या मताची.

**मनोहर**— फारच उंच मतं आहेत तुझीं ! मारे modern education घेणारीं कॉलेजांतली मुलगी. पोषाख करण्यांतच काय ती तुझी प्रगति झालेली दिसते. बाकी विचारांच्या बाबतींत मात्र शून्य !

**कुंदा**— (संतापून) पुरे, पुरे ! आम्ही कुठं आहोंत स्कॉलर भाराभर पुस्तकं वाचायला ! तूं नि तुझे स्कॉलर मित्र बसा वाचीत नि विचार करीत. पुस्तकं वाचण हेंच कांही आम्हां बायकांचं ध्येय नाही आहे !

**मनोहर**— (तिरस्कारानें) मग कॉलेजांत तरी कशाला जातां ?

**कुंदा**— कशाला म्हणजे ? आहे आमची परिस्थिति म्हणून जातों ! परीक्षा पास होणं, हें थोडंच आमचं ध्येय आहे ?

**मनोहर**— (रागरागानें) पुरे, पुरे ! मोठी आली ध्येयवादाच्या गप्पा मारणारी ! ठाऊक आहे—

(कुंदा त्याच्याकडे रागाने पाहते. मनोहर तिरिमिरींत बाहेरच्या खोलींत जातो. देसाई उत्कंठित मनाने एका खुर्चीवर बसलेला दिसतो. तो एकदम उठून उभा राहतो; पण मनोहरला एकट्याला बघतांच पुन्हा निराश होतो.

**मनोहर**— (चेहऱ्यावर शांतता धारण करण्याचा प्रयत्न करीत) Sorry, देसाई—फार डोकं दुखतं आहे कुंदेचं.

**देसाई**— (चेहऱ्यावरील निराशा लपवीत, हसून) I see ! तसं कांही फारसं महत्त्वाचं काम नव्हतं. नुसते दोन शब्द विचारायचे होते.

**मनोहर**— I am extremely sorry ! बरं, जाऊं दे ! मीच विचारीन तिला, अन् मग सांगेन तुला.

**देसाई**— (त्याचें तोंड उतरतें. कोटाच्या खिशांतील रुमाल काढून तो तें पुसतो.) हरकत नाही; बरं, चला ! येतां का ?

**मनोहर**— (हसून) चला ! येतों की— थांबा हं, आलोंच. (जातो.)

**देसाई**— (कपाटाच्या आरशांत स्वतःकडे बघत निराशेने) हं ! निराशेचे एक एक कटु अनुभव येऊं लागले ! I never expected this. (इतक्यांत मनोहर येतो.)

**देसाई**— चला, काळे—

**मनोहर**— (डोक्यावर टोपी बसवीत) चला, निघालोंच.

[ दोघेही जातात. ]

---

## प्रवेश चवथा

(मागील गोष्टींना जवळ जवळ पांचसहा वर्षे लोटलीं आहेत. रा० ब० काळ्यांच्या वाड्यांतील दिवाणखाना. भिंतींना फिकट हिरवा रंग दिलेला असून त्या तऱ्हतऱ्हेच्या सुंदर चित्रांनी अलंकृत झालेल्या आहेत. मध्यभागीं एक मोठें राउंड टेबल असून भोंवताली कोच, खुर्च्या वगैरे ठेवलेलीं आहेत. एका मोठ्या इझिचेअरवर रावबहादुर धूम्रपान करीत पडले आहेत. त्यांच्या खुर्चीच्या हाताशीं त्यांच्या अर्धांगी उभ्या आहेत. राउंड टेबलापाशी एक वर्तमानपत्र वाचीत मनोहर उभा आहे. ह्या पांचसहा वर्षांत तो एक तडफदार, तरतरीत तरुण दिसूं लागला आहे. डोळ्यांना चष्मा लागला आहे.)

**रा० बाई**— (पतीकडे पाहून आर्जवी स्वरांत) ऐकलं का ? आता किती दिवस कुंदेला अशीच ठेवायची ? तिच्याबरोबरीच्या मुलींचीं लग्नं होऊन सुद्धा गेलीं— नि माझी कुंदा तर त्यांच्यापेक्षा कितीतरी सुरेख— श्रीमंताची ! अन् अजून आपली तशीच.

**रा० बहादुर—** ( सिगारेटची राख झाडीत, किंचित् रागीट किंचित् उदासीन स्वरांत ) पण त्याला माझा काय इलाज आहे ? मी आपल्याकडून ह्या कामांत कधीच हयगय किंवा दुर्लक्ष्य केलं नाहीं ! आज चारपांच वर्षं सारखीं स्थळं पाहतों आहें !

**रा० बाई—** ( मध्येच ) पण नुसतीं स्थळं बघून काय उपयोग ? जमलं तर नाही ना अजून कुठं ?

**रा० बहादुर—** ( रागानें ) कसं जमणार ? कुंदेच्या इतर साधारण मैत्रिणींचीं लग्नं झालीं– कबूल ! पण त्यांची दृष्टि कुठं आणि आमची कुठं !

**रा० बाई—** तें तर खरंच ! त्यांच्यासारखी वाटेल त्याला मुलगी द्यायला काय आम्ही फकिरी थोडीच पत्करली आहे !

**रा० बहादुर—** हेंच–हेंच तर जिथं तिथं नडलं, नडतं, आणि अजूनहि नडेल. पहिल्यापासून तुला आपल्या श्रीमंतीची कोण घमेंड ! आपली मुलगी सुंदर, आपल्याजवळ पैसा रग्गड असं पाहून तूं पहिल्यापासून चांगलीं चांगलीं स्थळंसुद्धा नाकारलींस. I. C. S. पाहिले, I. M. S. झाले ! पहिल्यांदा तर I. C. S. शिवाय मुलीला कुठं द्यायचीच नाही, असा निश्चय होता; पण ते जसे तिला नाकारूं लागले तशी तूं जरा खालीं उतरलीस. मुलीचं वयाहि मोठं होऊं लागलं. I. C. S. ला ती मोठी होऊं लागली. तेव्हा तूं बड्या पगारदाराकडे वळलीस ! पण तेहि कुंदा आपल्यापेक्षा फारच तोलाची असं वाटून तिच्याहून वयानं लहान, पण कमी शिकलेल्या मुली पत्करूं लागले ! अन् आज अशी वेळ येऊन ठेपली आहे की, कुंदेशीं लग्न करायला कोणीहि तयार नाही !

**रा० बाई—** ( डोळयांतील अश्रु पदरानें पुशीत ) झालं, आपण तर सगळं माझ्यावरच घातलंत ! ह्यांत माझा काय दोष ? आपल्या मुलीला

चांगलं स्थळ मिळावं, अशी माझी इच्छा. ह्यांत काय मी गुन्हा केला ?

**रा० बहादुर—** हो, तुझा ह्यांत दोष नाही, माझाहि नाही ! मग कोणाचा ?

**रा० बाई—** माझी कुंदा मात्र लग्नाशिवाय राहिली आहे खरी, दोष कुणाचाहि असो !

**रा० बहादुर—** कुंदा तरी अगदीच, तूं समजतेस तितकी निर्दोष नाही बरं ! आता ह्या एवढाल्या मुली झाल्या, आम्ही ह्यांना कॉलेजचं शिक्षण दिलं, आता ह्यांचं लग्न आम्ही कसं करायचं ? खरोखर, कुंदेनं आपणच स्वतःच्या मतानं आपला जोडीदार हुडकून काढायला हवा होता ! पण तेव्हा ही आपली तोऱ्यांत !

**रा० बाई—** (कपाळाला आठ्या घालून) हें काय आपलं कांहीच्याबाहीच बोलणं ! कुंदा काय माझी तशी फाजील मुलगी नाहीच मुळी ! ती अल्लड असेल, लाडकी असेल, पण तें नाही हो तिच्या अंगांत. कॉले-जांत होती, पण कधी कुणाशीं बोलणं नाही कीं चालणं नाही.

**रा० बहादुर—** तिच्याबरोबर एकदोन मुलींनी नाही का आपल्या पसंतीनं आपलीं लग्नं जुळवलीं ?

**रा० बाई—** कोण त्या ? ती मालती नि सुशीलाच ना ? अहाहा ! काय पण जोडीदार हुडकून काढले आहेत ! असल्या भिकाऱ्याशीं लग्न करायला कांही माझी कुंदा वर आलेली नाही, बरं !

**रा० बहादुर—** हो, वर आली नाही खरी; म्हणूनच आज खाली बसली आहे !

**रा० बाई—** ( रडत ) आपल्याच मुलीसंबंधी आपल्याला असे कठोर

शब्द काढवतात तरी कसे ? तिच्याविषयी कांहीच का आपलेपणा वाटत नाही ? (रा० बहादुर कांहीच बोलत नाहीत. रा० बाई जरा वेळाने डोळे पुसतात; त्यांचें लक्ष्य मनोहरकडे जातें. तो अजून तसाच वाचनांत मग्न होऊन उभा आहे; निदान आईबापांच्या संभाषणाकडे आपलें लक्ष्यच नाही, असें सोंग तरी करीत आहे.)

**रा० बाई**— (मनोहरकडे वळून) मनोहर, (मनोहर एकदा वर पाहतो.) तूं आता एवढा मोठा, शिकलासवरलेला भाऊ; बहिणीसाठी एक स्थळहि तुझ्यानं बघवत नाही ना ? (मनोहर कांहीच बोलत नाही. पुन्हा वर्तमानपत्रांत डोकें खुपसतो.) मनोहर, अरे ऐकूं येतं कीं नाही ? (तरी मनोहर वर बघत नाही. रा० बाई संतापाने) ठेव बघूं तें मेलं वर्तमानपत्र बाजूला ! घरचं नको पहायला, नि गावाच्या चौकशा करायला बरं वाटतं, नाही ! (मनोहर वर्तमानपत्रांतून वर पाहतो.) ऐकलंस का मी काय म्हटलं तें ?

**मनोहर**— (कपाळाला आठ्या घालून) हो, ऐकलं !

**रा० बाई**— मग ? कुंदेचं लग्न व्हावं, अशी तरी इच्छा आहे कीं नाही ? आपल्याला एक लग्नाची बहीण आहे, हेंहि विसरलास कीं काय ?

**मनोहर**— (वर्तमानपत्र जवळ करून) मला ह्या फंदांत पडायची मुळीच इच्छा नाही !

**रा० बाई**— (चिडून रा० बहादुरांकडे वळून) पाहिलं एकदा! कसा बोलतो तो ? (रा० बहादुर कांहीच बोलत नाहीत. त्या रडूं लागतात.) सगळ्यांनीच मुळी जर असं केलं, तर त्या पोरीचे मात्र हाल आहेत !

**मनोहर**— (रागारागाने) मी मुळीच ह्या फंदांत न पडण्याचा निश्चय केला आहे ! कारण कुंदेची स्वतःविषयीची कल्पना फार मोठी आहे. तिच्या तोलाला येण्याइतके निदान माझेतरी मित्र कोणी नाहीत, मग

त्याला मी काय करणार? मागं एकदा माझ्या एका मित्राची तिच्याशीं ओळख करायची इच्छा होती, म्हणून मी त्याला घेऊन आलों; पण कुंदा नुसती त्याच्याशीं बोलेनासुद्धा! धडधडीत त्याचा आणि माझा तिनं इन्सल्ट केला! तेव्हापासून मी ठरवून टाकलं आहे की, कुंदेच्या फंदांत आपण पडायचं नाही!

(इतक्यांत रा० बहादुरांना कसलीतरी आठवण होते. ते मनोहरला हाक मारतात. मनोहर त्यांच्याजवळ जातो. ते दोघे आपसांत कांहीतरी कुजबुजतात. रा० बाई हातांत डोकें दाबून बसतात.)

**रा० बहादूर—** (मनोहरला मोठ्याने) बरं, मग तेवढं काम कर तूं आता.

**मनोहर—** (तुटकपणें) तुम्ही आता म्हणतांच आहांत म्हणून जातों मी बापडा! त्याला मी इथला रस्ता दाखवीन फक्त! पुढल्या बाबतींत भाग घ्यायची माझी मुळीच इच्छा नाही!

**रा० बहादूर—** बरं, तसं का होईना! त्याला इकडे सोडून खुशाल तूं बाहेर निघून जा.

(रा० बाई हे शब्द ऐकून आशेने पतिराजांकडे पाहतात.)

**रा० बहादूर—** (पत्नीकडे बघून) बरं—हें बघ, आज एक स्थळ बघितलं आहे. चार वाजतां येतील ते!

(इतक्यांत दरवाजा उघडून कुंदा प्रवेश करते. कुंदेंत ह्या पांचसहा वर्षांत खूपच फरक झाला आहे. पूर्वीचा तिच्या चेहऱ्यावरचा हसरेपणा जाऊन तेथे आता गंभीरपणा पसरला आहे. पूर्वीचा चेहऱ्यावरचा तजेला तर पार नाहीसा होऊन तो फिकट दिसूं लागला आहे. पूर्वी येत असलेला केसांचा मोठा अंबाडा आता फारच रोडावला आहे. डोळे पूर्वीप्रमाणेच विशाल आहेत; पण त्यांच्यांतील चमक नाहीशी झाल्याने त्यांचेंही सौंदर्य नष्ट झालें आहे. प्रकृतीनेही ती खूपच कृश झाली आहे.)

**कुंदा**— (आपण येतांच एकदम स्तब्धता पसरलेली पाहून) हें काय? मी आल्याबरोबर सर्वांना एकदम गप्प व्हायला काय झालं?

(रा० बहादुर पत्नीकडे बघतात. मनोहर मात्र बेफिकीरपणें वर्तमानपत्र वाचीत उभा राहतो.)

**कुंदा**— (किंचित् रागावून) उगाच आलें म्हणायची मी मध्येच— जातेंच कशी! (ती जाऊं लागते.)

**रा० बाई**— अग कुंदा, अशी रागावतेस काय? कांही नाही हो! ये इकडे, बैस अशी. (कुंदा रा० बाईजवळ जाऊन उभी राहते.)

**रा० बाई**— (पतिराजांकडे पहात) हें बघ, आज तुझ्यासाठी एक नवीन स्थळ पाहिलं आहे बरं, आम्ही!

**कुंदा**— (रागीट स्वरांत) आई! किती दिवस आता माझं प्रदर्शन चालणार? (मनोहर एकदम तिच्याकडे बघतो.) किती तरी जणांनी येऊन मला पाहिली असेल. पहिल्यापहिल्यांदा आपणच सगळ्यांना नाकारलं, आता लोक मला नाकारूं लागले आहेत. तें असो, मी तरी आता त्या त्रासाला कंटाळून गेलें आहे; नि ह्यापुढं कुण्णापुढंहि जायचं नाही, असं ठरवून टाकलं आहे! (मनोहर पुन्हा तिच्याकडे पाहतो. रा० बहादुर एक सुस्कारा टाकतात.)

**रा० बाई**— (आर्जवी स्वरांत) असं करून कसं बरं चालेल, कुंदा?

**कुंदा**— काय चालायचं आहे? नाही होणार माझं लग्न, इतकंच ना? नाही तर नाही! मी तश्शी रहायला अगदी राजी आहें. (ती रडूं लागते.)

**रा० बाई**— (तिच्या केसांवरून हात फिरवीत) छे—छे! असं कसं बोलतेस तूं, कुंदा?

**कुंदा**—(डोळे पुसून) माझा अगदी निश्चय झाला आहे! ह्यापुढं तुम्ही कुणालाही दाखवण्याचा फार्स करूं नका. बाबांना त्रास नको, नि दादाला तर त्याच्यापेक्षाहि नको!

**रा० बहादुर**— बरं, हें बघ—कुंदा, आता त्यांना सांगितलं आहे, तेव्हा आज तरी त्यांना बघूं दे. मग ह्यापुढं मात्र पाहिजे तर तुझ्या इच्छेप्रमाणं करूं.

**कुंदा**— बरं! कधी येणार आहेत ते?

**रा० बहादुर**— येतील चार वाजतां!

**रा० बाई**— खरंच, पण कोण आहेत ते, हें नाही सांगितलं?

**रा० बहादुर**—(मनोहरकडे बघून) ते ना— England-returned नाही आहेत. दिल्लीच्याच परिक्षेला बसले होते. नुकतंच त्यांना I.C.S. मध्ये select केलं आहे.

**रा० बाई**— (सुटकेचा एक सुस्कारा टाकून आनंदाने) ऐकलंस ना कुंदा? छान स्थळ आहे, बघ! आता हस बघूं थोडीशी! (कुंदा खिन्नपणें हसते.) इथं जमेल हो तुझं—जा आता! आपली तयारीबियारी कर पाहूं.

**कुंदा**— (किंचित् हसून) तयारी कसली आली आहे?

(ती जाते. रा० बाईहि उठतात. रा० बहादुर खाकरण्यासाठी खिडकीपाशी जातात. मनोहरहि वर्तमानपत्र खाली ठेवतो व हळूहळू तेथून निघून जातो.)

(वरील प्रसंगानंतर चार वाजण्याचा सुमार. कुंदा व रावबहादुरीणबाई दिवाणखान्याच्या अलिकडच्या खिडकींत उभ्या आहेत. 'तयारी कसली?' असें विचारणाऱ्या कुंदेने नाही म्हटलें तरी जरा चांगला पोषाख केलाच आहे. पिवळा सोनसळी रास्ता व पांढरें शुभ्र रेशमी ब्लाउझ तिने परिधान केलेलें आहे. रा० बाईंच्या चेहऱ्यावर उत्सुकता व आनंद पसरला आहे; कुंदेच्या चेहऱ्यावर मात्र

पूर्वीपेक्षा कांहीच फरक दिसत नाही.)

**कुंदा**—(मध्येच आठवण झाल्यासारखें करून) खरंच आई, त्यांचं आडनांव विचारायचं विसरलेंच की अजिबात!

**रा० बाई**—अगबाई, खरंच की! मी पण घाईत अगदी अजिबातच विसरलें की! बरं, जाऊं दे, विचारूं मग!

**कुंदा**— हं!

(खोलींत पुन्हा स्तब्धता पसरते. रा० बाई खिडकींतून बघत उभ्या राहतात. कुंदेच्या डोळयांसमोरून कॉलेजांत प्रवेश केल्यापासूनचे आपल्या आयुष्याचे चित्रपट जाऊं लागतात. कॉलेजांत प्रवेश केल्यावर सर्वत्र आपल्या सौंदर्याची कशी वाहवा होत होती, पुष्कळ मुलें कशीं आपल्या मागे असत, आपण कशा ताठ्यांत असूं, तें तिला आठवूं लागतें. दुसऱ्या क्षणांत तिला तो प्रसंग आठवतो. देसाईची मूर्ति तिच्यासमोर उभी राहते, तिच्या डोळयांत अश्रु उभे राहतात— इतक्यांत रस्त्यावर मोटार थांबल्याचा आवाज ऐकूं येतो; कुंदा दचकते.)

**रा० बाई**— (घाईघाईने) अगबाई, कुंदा! आले हो, ते!

(कुंदा पदर सावरून नीट उभी राहते. एकदाच ती समोरच्या कपाटाच्या आरशांत पाहते.)

**रा० बाई**— सुरेख दिसते आहेस हो तूं, कुंदा!

(कुंदा नुसती हसते. जिन्यावर पावलांचा आवाज ऐकूं येतो.)

**कुंदा**— खरंच, आई, दादा आहे का गऽ?

**रा० बाई**— नाही, बाई! दिसला तरी नाही.

**कुंदा**— तो असता तर बरं झालं असतं.

**रा० बाई**— पण भिण्याचं काय कारण, कुंदा? हे आहेत ना?

**कुंदा**— हो, तें तर झालंच.

(इतक्यांत रा० बहादुर खोलींत प्रवेश करतात.)

**रा० बहादुर**—(कुंदेकडे पाहून घाईघाईने) आले ते; कुंदा! चल—

**कुंदा**— हो.

(कुंदा रा० बहादुरांच्या मागे जाऊं लागते. रा० बाई दारापाशी जाऊन उभ्या राहतात. धीरगंभीर चेहऱ्याने कुंदा वडिलांच्या मागोमाग दिवाणखान्यांत जाते. ती वर बघतच नाही.)

**रा० बहादुर**— ही आमची कुंदा. (कुंदेला उद्देशून) बैस ना बाळ, कोचावर. (कुंदा जवळच्याच कोचावर बसते.)

**पाहुणे**—(कुंदेकडे सप्रेम नजरेने पहात) मला वाटतं, मी इथं ह्यापूर्वी आलेला आहें.

(त्या आवाजाने दचकून कुंदा वर आश्चर्याने पहाते. सिल्कचा सूट घातलेल्या, बुद्धिमत्तेच्या तेजाने शोभणाऱ्या तरतरीत चेहऱ्याच्या देसाईला तिने चटकन् ओळखलें. एकदम तिच्या चेहऱ्यावर आनंदाची एक छटा चमकली. पण लज्जा व खजीलपणा ह्यांनी ग्रस्त झाल्यामुळे तिला वरहि बघवेना.)

**रा० बहादुर**—(सविस्मय) काय म्हणतां? आपण आमच्याकडे आलां होतां? म्हणजे आमच्या मुलाचा आणि आपला पूर्वपरिचय होता कीं काय?

**देसाई**—(हसत हसत) हो; मी आणि ते एकाच कॉलेजांत होतों.

**रा० बहादुर**—(भोळेपणाने) हो का? पण तो कांही तसं बोलला नाही माझ्यापाशी! मग, कदाचित् आमच्या कुंदेची नि आपलीदेखील ओळख असेलच. काय ग, कुंदा? (कुंदा एकदा हळूच तिरकस दृष्टीने वर देसाईकडे पहाते. पण त्याच्या चेहऱ्यावर रागाची बिलकुल छटा नसून उलट तो प्रेमपूर्ण नजरेनेच आपल्याकडे पहात आहे, असें पाहून ती सुटकेचा एक निःश्वास टाकते.)

**देसाई**—( कुंदेकडे बघत ) ओळख म्हणजे काय ? तशी म्हटलं तर आहेहि !

**रा० बहादुर**—( हसत ) म्हणजे आहेच म्हणा की ! मग काय ? फारच उत्तम. माझं कामच संपलं म्हणायचं !

( इतक्यांत रा० बहादुरांचा गडी प्रवेश करतो. )

**गडी**—( रा० बहादुरांकडे पहात ) माफ करा, साहेब ! आपल्याकडे कोणी तरी आलं आहे !

**रा० बहादुर**—( कपाळाला आठ्या घालून ) आत्ता ? मी नाही घरांत म्हणून सांग.

**गडी**— जरूरीचं काम आहे म्हणतो, साहेब !

**रा० बहादुर**—( थोडा वेळ विचार करून ) बरं, आलोंच. ( देसाईकडे वळून दिलगिरीच्या स्वरांत ) जरा जाऊन येतोंच—माफ करा. ( घाईघाईने जातात. देसाई व कुंदा एकटींच त्या खोलींत राहतात. कुंदेचा चेहरा लाजेने लाल झाला आहे. )

**देसाई**—( उठून कुंदेजवळ जाऊन ) कसं काय ? डोकंबिकं तर नाही ना दुखत पुन्हा ? ( कुंदेची मान अधिकच खाली जाते. देसाई प्रेमळपणें हसतो. )

**कुंदा**— ( हळूहळू वर बघत, कापऱ्या स्वरांत ) माझ्या हातून चूक झाली—क्षमा—

**देसाई**—( हसत ) छे, छे ! मी बिलकुल रागावलों नाही ! एका वेळीं रागावलों होतों—पण आता तो राग कधीच नाहीसा झाला आहे. नाही तर मी आलों तरी असतों का ?

**कुंदा**— ( तांबूस झालेलें आपलें तोंड वर करून ) मला बिलकुल कळत नव्हतं तेव्हा ! कांही तरीच बोलायची मी.

**देसाई**— जाऊं दे ! पूर्वीचं पूर्वी ! आता काय त्याचं ? आता तर नाहीत ना तुझीं तशीं मतं ? (त्याचा चेहरा एकदम गंभीर होतो.) खरंच, पण— कुंदा ! आजच्या माझ्या ह्या उत्कर्षाला तूंच कारणीभूत झाली आहेस. (कुंदा त्याच्याकडे प्रश्नार्थक मुद्रेने पाहते.) त्या दिवशीं तूं मला झिडकारलंस, (कुंदा खाली मान घालते.) तेव्हा मला फार वाईट वाटलं; पण मी अगदी निश्चय केला. तुला मिळवायचं तर I. C. S. च झालं पाहिजे, असं मी ठरवलं. अन् तेव्हापासून सतत श्रम करून—हाडाचीं काडं करून मी अभ्यास केला, आणि सुदैवानं मला यशहि आलं माझ्या प्रयत्नांत. हीं पांच वर्षं मी किती मेहनत केलीं तें माझं मला माहीत ! पण कुंदा, माझ्या साऱ्या श्रमांचं फळ खरोखरच मला आज लाभत आहे ! (देसाई पुन्हा हसूं लागतो.) कुंदा, आज जर दुर्दैवानं मी परिक्षेंत यशस्वी झालों नसतों तर ह्या एका गरीब मुलाला कॉलेजांतल्या ओळखीवर इथं प्रवेश तरी मिळाला असता का ? (कुंदा लाजेने चूर होऊन जाते. अलिकडे कधीहि दिसली नसेल इतकी ती आता सुंदर दिसते. पूर्वीचें सौंदर्य पुन्हा एकदा तिच्या चेहऱ्यावर शोभूं लागतें. देसाई तिजकडे सप्रेम नजरेने पहात म्हणतो.) बरं, तें जाऊं दे, आता—तरी तूं माझी होशील ना ?

(देसाई कुंदेला प्रेमभराने जवळ ओढतो. दुसऱ्याच क्षणीं पावलांचा आवाज ऐकूं येतो. तीं दोघें आरक्त चेहऱ्याने दूर होतात.)

---

फेब्रुवारी १९३२

# प्रवेश पहिला

( गावदेवीवरील एका ब्लॉकमधील खोली. दारांना व खिडक्यांना पडदे लावलेले आहेत. बाजूला एक शेल्फ असून त्यावर कांही पुस्तकें अस्ताव्यस्त पडलेलीं आहेत. बाजूच्या एका भिंतीला टेकून एक टेबल आहे. त्यावर एक लिहिण्याचें पॅड, पुस्तकें व वह्या पडलेल्या आहेत. दुसऱ्या भिंतीला एक ड्रेसिंग टेबल आहे. त्यासमोर गाणें गुणगुणत, केस सारखे करीत नीला निमकर उभी आहे. ती एक डिझाइनचें सहा वारी पातळ नेसलेली असून तिच्या बिन-बाह्यांच्या जंपरवर एक लांब वेणी रुळत आहे. )

**नीला**— ( दारावरील 'टक् टक्' आवाजाने चमकून मागे पहात ) कोण ? अविनाश ? कधी आलांत ? ( त्याला पाहून झालेला आनंद तिच्या डोळ्यांत प्रतिबिंबित झाल्याशिवाय रहात नाही. )

**अवि०**— ( त्याचे केस चापून चोपून बसविलेले असले तरी कुरळे दिसत आहेत. डोळे पिंगट, तपकिरी रंगाचे असून चेहऱ्यावर हास्य चमकत आहे. ) आंत येऊं का ?

**नीला**— हो, या ना !

**अवि०**— ( आंत येऊन तिच्या लांब वेणीकडे पहात ) तुमच्या कामांत व्यत्यय नाही ना आणला मी ?

---

**नीला**— ( हसत ) छे- छे ! तुम्ही कधीहि आलांत तरी मला त्रास होत नाही.

**अवि०**— ( तिच्या पातळाकडे पाहून ) कुठं बाहेर निघालांत वाटतं ?

**नीला**— ( त्याच्या डोळ्यांवरून त्याला तिचें पातळ आवडलें असावें असें वाटतें. ) हो ! आम्ही सिनेमाला जाणार आहोंत आज.

**अवि०**— कुठल्या ?

**नीला**— कुणाला माहीत ! विमलेचा ध्यास चालला आहे परवा-पासून चल म्हणून.

**अवि०**— बरं, मग मी जातों—

**नीला**— ( आग्रहाने ) छे, छे, बसा ना. अजून वेळ आहे थोडासा. ( अविनाश एका खुर्चीवर बसतो. )

**अवि०**— ( टेबलावरील एक पुस्तक उचलून ) हें कुठून आणलंत तुम्ही ?

**नीला**— लायब्ररींतून.

**अवि०**— कुठल्या ?

**नीला**— कॉलेजच्या. तुम्हांला हवं आहे ?

**अवि०**— हो. ( तिच्या डोळ्यांकडे पाहून ) तुम्ही वाचलेलीं पुस्तकं मला वाचावींशीं वाटतात नेहमी.

**नीला**— ( आनंदून ) हो ?

**अवि०**— खरंच !

**नीला**— कां ?

**अवि०**— कुणाला ठाऊक ! वाचावींशीं वाटतात खरीं ! काय कथा-नक आहे या गोष्टीचं ?

**नीला**— ( गळ्यांतील माळेशीं खेळत ) कांही नाही. एका मुलाचं एका मुलीवर प्रेम असतं. पण तिच्या प्रेमाची खात्री नसल्यानं आणि लाजऱ्या स्वभावानं तो तिला मागणी घालायला भितो. ती त्याची वाट पाहून शेवटीं दुसऱ्यालाच माळ घालते.

**अवि०**— ( विचारमग्न मुद्रेने ) मागणी घालण्याची जबाबदारी पुरुष-जातीवर कोणी टाकली कोण जाणे !

**नीला**— ( त्याच्याकडे सूक्ष्म नजरेने पहात ) कां ?

**अवि०**— मुलीनं 'हो' म्हटलं तर बरं. नाहीतर कोण फजिती !

**नीला**— ( त्याच्या डोळ्यांकडे पहात ) पण तुम्हांला हा केवढा अधिकार मिळाला आहे ?

**अवि०**— कसा ?

**नीला**— ( त्याच्याकडे लाजऱ्या नजरेने बघून ) जिच्यावर तुमचं प्रेम असेल तिला तडक विचारतां येतं तुम्हांला. बायकांना मात्र बोलायचीहि चोरी !

( अविनाश हसतो. इतक्यांत दरवाजावरचा पडदा बाजूला सारून विमला प्रवेश करते. ती रूपाने नीलेसारखीच पण तिच्याहून लहान आहे. )

**अवि०**—( विमलेकडे पाहून हसत ) काय हो, तुम्ही हल्ली कुठं दिसत नाही ?

**नीला**— ( विमलेवर लागलेली अविनाशची नजर व चेहऱ्यावरील मोहक स्मित पाहून स्वतःशींच ) कांही नाही. विमीकडेही ते तितक्याच प्रेमळ नजरेने पाहतात, आणि तितक्याच मोहकपणें हसतात ! त्यांची हसून बोलायची पद्धतच आहे ! मी वेडी उगीचच त्याचा भलताच अर्थ घेऊन बसलें आहे.

**अवि०**— ( नीलेकडे पाहून ) कसला एवढा विचार चालला आहे ?

**नीला**— कांही नाही ! सहज—

**विमला**— (पाठीवरील वेणी पुढे आणून ) ताई ! चल, सिनेमाला येतेस ना ? सहा वाजले आता !

**नीला**— कुठल्या ? मला नांव नाहीच सांगितलंस ?

**विमला**— पॅथेला ! छान फिल्म आहे.

**नीला**— ( अविनाशकडे पाहून ) येतां ?

**अवि०**— ( मनगटावरील घड्याळाकडे पाहून ) आलों असतों, पण रात्रींच एका मित्राबरोबर जायचं कबूल केलं आहे !

**नीला**— ( निराशेने ) बरं ! ( स्वतःशीं ) त्यांना कांहीच माझ्याविषयी वाटत नाही. नाहीतर त्यांना मित्राला थाप नसती का मारतां आली ?

**अवि०**— ( नीलेकडे पहात ) उद्या मी येऊं शकेन.

**विमल**— उद्या काय उपयोग ? उद्या बदलेल तो बोलपट. उद्या शनिवार ना ?

**नीला**— ( अविनाशकडे बघून ) आजच यायचं असलं तर या— ( खरोखर अविनाशसाठी तिला उद्याच जायला आवडेल; पण नादिष्ट विमलेला तसें म्हणणें शक्य नव्हतें. )

**अवि०**— आज कसं जमणार ?

**नीला**— हो ना ? किती वाजले ग विमे ? सहा ? ( अविनाशकडे पाहून मनांतील निराशा लपविण्याचा प्रयत्न करीत ) बरं, जातों आम्ही !

**अवि०**— ( टेबलावरील टोपी उचलीत पण नीलेकडे पहात ) बरं, मीहि निघालोंच.

**नीला**— ( आनंदाने ) कुठं आमच्याबरोबर ?

**अवि०**— नाही. त्या मित्राला कबूल केलं आहे ना ? ( नीला त्याच्या चेहऱ्यावरील निराशा पाहून अडखळते. )

**विमला**— ( तिला ओढून ) चल ग आता ! हाहि 'खेळ' घालवायचा आहे वाटतं ?

( नीला एकदा अविनाशकडे नजर फेकून चालूं लागते. अविनाशहि तिच्यामागे जाऊं लागतो. )

---

## प्रवेश दुसरा

( नीलेच्या घराचा जिन्याचा दादर. हातांतील पुस्तकांचा भारा कसाबसा आवरीत गळयावरून वेणी पुढे आणीत, धापा टाकीत नीला जिना चढून वर येते व उतावीळपणें घंटा दाबते. सोळा वर्षांचा एक मुलगा दार उघडतो. त्याने परीटघडीचा पायजमा व शर्ट घातलेला असून त्याच्या चेहऱ्यावरून तो नीलेचा भाऊ असावा, असा कोणीहि तर्क केला असता. )

**नीला**— ( छत्री त्याच्या हातांत देत ) घे रे एवढी किशोर !

**किशोर**— ( मागे सरून ) तर तर ! तुझा नोकरच किनी !

**नीला**— ( ओरडून ) अरे, पण जरा घेतलीस तर काय होईल ? मी किती दमलें आहे आज, कल्पना तरी आहे का तुला ?

**किशोर**— ( तिच्या हातांतील पुस्तकांच्या भाऱ्याकडे बघून ) भरल्या गाड्याला सुपाचं ओझं थोडंच होतंय् ?

**नीला**— ( चिडून ) तूं तर अस्सा आहेस अगदी ! एखाद्या सख्ख्या भावाला बहिणीची किती कींव आली असती !

**किशोर**— तुझी काय कींव यायची बुवा ? सांगितलं आहे कुणी बी. ए. व्हायला ? नको होऊंस !

**नीला**— बरं, बरं ! तुला नाही विचारलं कोणी ! फाजील कुठचा ! ( त्याला धक्का देऊन आंत शिरते व पुस्तकें टेबलावर फेकून देत पलंगावर आदळते. त्या आवाजाने विमला खोलींत काय झालें तें पहावयास येते. )

**विमला**— ( पुस्तकांची दशा पाहून ) ताई, काय हें ? फाटून जातील ना तीं पुस्तकं !

**नीला**— ( पलंगावर लोळत, तिच्याकडे न पाहतां ) जाऊं देत ! तुला नको त्यांची काळजी !

**विमला**— पण लायब्ररीचीं असतील ना तीं ? भरून द्यावीं लागतील की !

**नीला**— ( खेकसून ) तुला कोणी तोंड घालायला सांगितलं आहे ग मध्ये ? माझं मी बघून घेईन.

**विमला**— ( थोडा वेळ ताईकडे पहात उभी राहते. नंतर एकदम आठवण झाल्यासारखें होऊन ) खरंच ताई, ते बाळासाहेब मिरजकर आले होते विल्यापारल्याहून ! ( नीला कांहीच बोलत नाही. ) ते तुझ्याकडेच आले होते मुद्दाम ! ( तरी नीला तिच्याकडे बघत नाही असें पाहून ) तुझ्याकडे फार महत्वाचं काम आहे वाटतं त्यांचं. उद्या संध्याकाळीं पांच वाजतां त्यांनी तुला जरूर बोलावलं आहे.

**नीला**— ( भिंतीकडे तोंड करून ) मी जाणार नाही !

**विमला**— ( आश्चर्याने ) कां ?

**नीला**— मला नाही जायचं म्हणून.

**विमला**— पण त्यांनी कित्ती आग्रह केला आहे ! त्यांचं महत्त्वाचं काम आहे म्हणून सांगितलं ना ?

**नीला**— माहीत आहे मला त्यांचं महत्त्वाचं काम काय तें !

**विमला**— काय आहे सांग बघूं ?

**नीला**—( तिरसटपणें ) तुला कां म्हणून मी सांगेन ?

**विमला**— नको सांगूंस ! पण तुला गेलं हें पाहिजेच. आईहि म्हणाली.

**नीला**— पण मी नाही जाणार म्हणून सांगितलं ना ! मला काय बांधून थोडीच नेणार आहांत तुम्ही ? बरं, आणि चहाबिहा देशील कीं नाही कांही ?

**विमला**— आताच झाला आमचा. भटजी गेले बाहेर.

**नीला**— बरं झालं ! पण आई असेल ना ?

**विमला**— हो आहे ! ए आई—

( नीलेची आई प्रवेश करते. )

**आई**— काय ग चाललंय् तुमचं ?

**विमला**— ( लोळणाऱ्या नीलेकडे पाहून ) चहा पाहिजे आहे ताईला !

**आई**— मग ? एवढं ओरडायला काय झालं ?

**विमला**— कांही नाही ! ही उगीचच चिडली आहे आल्यापासून ! तिला मी सांगितलं की, उद्या बाळासाहेब मिरजकरांनी तिला जरूर बोलावलं आहे म्हणून ! ती नाही जाणार म्हणते.

**आई**— खरंच नीला, उद्या तुला त्यांनी फार आग्रहानं यायला सांगितलं आहे. कांही काम आहे त्यांचं.

**नीला**— कुठलं तरी स्थळ आणलं असेल, दुसरं काय ? आज किती दिवस तुझ्या मागं लागले आहेत ! माझं लग्न जमवायला ह्या मध्यस्थांची जरूर नाही ! ( विमल आश्चर्याने तिच्याकडे बघते. )

**आई**— पण नुसतं जायला काय हरकत आहे ?

**नीला**— ( निष्काळजीपणें ) मला नाही जायचं म्हणून सांगितलं ना ?

**आई**— पण एखाद वेळेला चांगलं स्थळ असलं तर उगीच कां हातचं घालवायचं ? बाळासाहेब तसं हवं त्याचं नांव नाहीच सांगायचे हो !

**नीला**— पण मला दुसऱ्याच्या मध्यस्थीनं लग्नच नाही करायचं म्हणून सांगितलं ना ? ते तुमच्या वेळचे दिवस गेले ! ज्या मनुष्याविषयी मला प्रेम वाटेल त्याच्याशींच मी लग्न करीन.

**आई**— अग, पण ह्या मनुष्याला तूं पाह्यलं तरी आहेस का ? तो वाईटच आहे असं कां धरून चालतेस ?

**नीला**— तो कसाहि असला तरी माझं त्याच्यावर प्रेम बसायचं नाही, ह्याची मला खात्री आहे.

**विमला**— कां ? दुसऱ्याच कोणावर प्रेम बसलेलं आहे वाटतं ?

**नीला**— ( एकदम उठून संतापाने ) विमले, चूप बसतेस कीं नाही ? फाजील नाहीतर ! लहान पोरींना ह्या गोष्टी कशाला हव्या आहेत ?

**आई**— ( हसून ) अग, तूं तिच्यासमोर हवं तें बोलतेस, मग ती बोलायचीच असं ?

**नीला**— काय बोललें मी ?

**आई—** तूं कशाला प्रेमाच्या गोष्टी बोलतेस तिच्यासमोर?

(इतक्यांत एक गडी नीलेच्या नांवाचें कार्ड घेऊन प्रवेश करतो. नीला उठून तें त्याच्या जवळून घेते.)

**आई—** कुणाचं गऽ?

**नीला—** (कपाळाला आठ्या घालून) बाळासाहेब मिरजकरांचं!

**आई—** काय लिहिलं आहे त्यांनी?

**नीला—** (बऱ्याच वेळानें) कांहीं नाही, तेंच. उद्या जरूर वेळांत वेळ काढून यायला सांगितलं आहे त्यांनी.

**आई—** मग? आता तरी जाणार कीं नाही? (नीला कांहींच बोलत नाही.) इतक्या वेळां त्यांनी बोलावलं आहे तेव्हा मला वाटतं, की म्हाताऱ्या माणसाच्या शब्दाची थोडीतरी किंमत ठेवावी. नुसतं जायला काय हरकत आहे? नाही पडलं तुला पसंत तर 'नाही' म्हणून सांग. जुलूम थोडाच आहे कोणाचा तुझ्यावर?

**नीला—** (जरा शांत होऊन) बऽरं! आता तूं एवढं म्हणतेच आहेस तर जाईन बापडी! पण मी कांही त्याचा विचारहि करणार नाही, हें आताच सांगून ठेवतें.

**आई—** हं! आता कशी शहाण्यासारखी बोललीस! अगदीच तरी बेपर्वा राहून जगांत चालायचं नाही. तूं जर हेकेखोरपणानं गेली नसतीस, तर बाळासाहेबांना काय वाटलं असतं बरं? आणि आज ते तुझ्या वडिलांच्या ठिकाणीं आहेत, हें विसरून चालायचं नाही. तुझ्या वडिलांनीसुद्धा कोणतीहि गोष्ट त्यांच्या सल्ल्याशिवाय केली नाही!

**नीला—** मला तें सारं माहिती आहे; आणि म्हणूनच तर मी जाणार

आहे उद्या ! नाहीतर कध्धीच नसतें गेलें ! ( पलंगावरून उठून ) बरं, पण चहा दे ना मला ! आज मी चार तास सारखी लायब्ररींत बसलें होतें ! ( आई स्वयंपाकघराकडे जाते. ) आणि, काय ग विमल, अविनाश आले होते का ?

**विमला**— ( फुरगटून खोलीबाहेर जात ) मला काय बाई माहीत ! तुझ्या भानगडींत आपण नाही गऽ बाई बोलणार ह्यापुढं !

**नीला**— नको सांगूंस जा ! फारच झाली आहेस नाहीतरी हल्ली ! ( स्वतःशी ) अविनाशांचं प्रेम असतं तर कशाला हिचीं आर्जवं हवीं होतीं ! त्यांना कुठं माझ्याविषयी काय वाटतं आहे ? ( स्वयंपाकघराकडे जाते. )

---

## प्रवेश तिसरा

( विलेंपारलें येथील बाळासाहेब मिरजकरांचा छोटेखानी बंगला. दिवाण-खान्यांत बाळासाहेब एक वर्तमानपत्र वाचीत पडले आहेत. त्यांचें वय पन्नाशीजवळ असावें. एका खिडकींतून रस्त्याकडे बघत त्यांच्या पत्नी रमाबाई उभ्या आहेत. )

**बाळासाहेब**— ( भिंतीवरील घड्याळाचे ठोके ऐकून एकदम ) पांच वाजले की ! नीला अजून आली नाही !

**रमाबाई**— ( पतिराजांकडे बघून ) ५–५ ला एक फास्ट गाडी आहे ना ? तिनं येईल मला वाटतं ती !

**बाळा०**— ( डोळ्यांवरील चष्मा काढून वर्तमानपत्र बाजूला ठेवून ) छे गऽ!

त्या गाडीनं तिला घरीं यायला सव्वापांच होतील ! मी तर तिला पांचलाच बोलावलं आहे.

**रमा०**— अं ! पांचाचे सव्वापांच व्हायचेच.

**बाळा०**— नाही. माझा अदमास आहे की, ती पावणेपांचच्या गाडीला यावी ! आता एकदोन मिनिटांत येईलच.

**रमा०**— बाकी आपल्या खटपटीला कितपत यश येईल, याचा संशयच आहे ! आजकालच्या मुली ह्या, आणि त्यांतून नीला मोठी स्वतंत्र मताची आहे हो !

**बाळा०**— ( चष्मा केसमध्ये ठेवीत ) अग, पण तो मुलगा तिला ओळखणारा आहे. तिच्या परिचयाचा आहे.

**रमा०**— ( आनंदाने ) ओहो ! आलीच नीला ! शंभर वर्षे आयुष्य आहे तिला !

**बाळा०**— ( घाईने उठून व्हरांड्याकडे जात ) आली का ?

( नीला प्रवेश करते. ती एक सुंदर रेशमी पातळ नेसली असून, नेहमीप्रमाणे वेणी तिच्या गळ्यावरून पुढे लोंबत आहे. तिच्या नेहमीच्या हसऱ्या चेहऱ्यावर आज मात्र त्रासिकपणा दिसत आहे. )

**बाळा०**— यावं यावं बाईसाहेब ! म्हटलं येतां कीं नाही ? ( नीला नुसती हसते. ) बैस ना ! अन् तोंड इतकं उतरूनसं गेलं आहे ? बरं नाही कीं काय ?

**नीला**— ( एका खुर्चीवर बसून ) बरं आहे.

**बाळा०**— नाही, फार उतरलेलं दिसतं आहे तुझं तोंड, म्हणून विचारतों.

**रमा०**— फार अभ्यास करतेस वाटतं ?

**बाळा०**— करायलाच पाहिजे. आता शेवटली परीक्षा ना ? आता पेढे नी लाडू एकदमच द्यायचे बरं का नीलाबाई !

**नीला**— (गंभीरपणें) पेढे देईन फार तर—

**बाळा०**— (हसत) वा ! नुसते पेढे कसे चालतील ? बायका कितीहि शिकल्या, तरी लग्नाशिवाय त्यांना तरणोपाय नाही बरं!

**नीला**— ते झाले तुमचे विचार.

**रमा०**— मग ? लग्नाशिवाय का राहणार आहेस नीला ?

**बाळा०**— छे, गऽ! लग्नाशिवाय काय रहाते ती ! तिचा बापहि असंच म्हणत असे; पण मी दिली सुंदरशी मुलगी पाहून, तेव्हा झाला कबूल ! आणि म्हणूनच तर आज नीलासारखीं गोड मुलं दिसताहेत आम्हांला !

**रमा०**— लग्नाच्या वेळेला आमची आठवण ठेवशील ना जुन्या माणसांची, नीला ?

**बाळा०**— वा, वा ! न ठेवून कसं चालेल ? म्हातारीं माणसं कितीहि नालायक ठरलीं, तरी त्यांच्यावाचून कांहीसुद्धा होत नाही बरं! काय नीला, खरं कीं नाही ?

**नीला**— मला नाही असं वाटत. लग्न हा प्रत्येकाचा व्यक्तिविषयक प्रश्न आहे. तो त्या व्यक्तीनं सोडवावा. दुसऱ्यांनी त्याच्यांत हात घालण्याचं काय कारण ?

**बाळा०**— वा, असं कसं म्हणतेस नीला ? अग, दुसऱ्यांनी मन घातल्याशिवाय का लग्नं जमतात ? अन् आज मी तुला या कामासाठीच बोलावलं आहे !

**नीला**— ( कपाळाला आठ्या घालून ) पण बाळासाहेब, तुम्ही कशाला त्रास घेतां उगीच ? माझ्या लग्नाविषयीच्या कल्पना अगदी वेगळ्या आहेत ! दुसऱ्यांनी लग्न जमवणं मी अपमानकारक समजतें.

**बाळा०**— अगदी वेडी आहेस तूं नीले ! अग, लहान पोरींना का कांही दूरदृष्टि असते ? आयुष्याचे महत्त्वाचे प्रश्न सोडवायला तूं लायक नाहीस अजून.

**नीला**— मग मी लग्न करायलाच लायक नाही म्हणायची ? जनावरंसुद्धा आपापले प्रियकर शोधून काढतात; मग माणसांना तेवढंहि होऊं नये का ?

**बाळा०**— बरं, तें राहूं दे थिअरींत. पण तूं आजचं स्थळ कोण, काय, हें तरी ऐकलं आहेस का ?

**नीला**— ( खिडकींतून बाहेर बघत ) मला ऐकायची इच्छाच नाही !

**रमा०**— अग, छान आहे हो स्थळ ! घरची इस्टेट, एकुलता एक मुलगा, वयानं सारा बावीस नाहीतर तेवीस. दिसायलासुद्धा काय देखणा आहे !

**नीला**—( अविनाशची मूर्ति डोळ्यांसमोर आणून स्वतःशीं ) अविनाशपुढे कोणीहि फिक्काच पडेल ! ( उघड ) हें पहा काकू, मी किनी अशा लग्नाच्या विरुद्ध आहें !

**रमा०**— अग, पण एकदा बघ तर त्यांना डोळ्यांनी ! माझी खात्री आहे की, तुला ते आवडतील !

**बाळा०**— अग, पाहिलेच आहेत मुळी तिनं त्यांना. त्यांची ओळख-हि आहे.

**नीला**— माझ्या ओळखीचे ? असतील कोणी असेच ! पण मला मुळी सध्या लग्नच करायचं नाही.

**बाळा०**— नीला, अगदी दुराग्रही आहेस तूं. माझं म्हाताऱ्याचं ऐक. मागून तुलाच पश्चात्ताप होईल, पहा.

**नीला**— बाळासाहेब, माफ करा. दुसरी कोणतीहि गोष्ट सांगा, पण एवढं नका सांगूं मला !

**बाळा०**— अग, पण तुझी ओळख तर होऊं दे. पुढं तुला ते कशावरून आवडणार नाहीत ?

**नीला**— ( अविनाशची मूर्ति आठवून ) छे, छे, तें शक्यच नाही ! कशाला त्या फंदांत पडतां ?

**बाळा०**— (निराशेने) बरं, मग तूं कांही तयार नाहीस तर ?

**रमा०**— पण नांवबीव तर सांगावं तिला ! कदाचित् पसंत पडेल हकीकत ऐकल्यावर—

**नीला०**— ( रमाबाईकडे वळून ) छे, छे ! कांही नको.

**बाळा०**— ( दुःखित स्वरांत ) कशाला उगीच ! जर ती नाहीच म्हणते, तर कशाला उगीच त्याचं नांव तरी सांगायचं ?

**नीला०**— जाऊं द्या ना तो विषय. या भानगडींत पडूंच नका. मी आईला पण तेंच सांगितलं आहे की, माझ्या लग्नाची दुसऱ्यांनी वकिली केलेली मला खपायची नाही म्हणून. माझं लग्न ठरवायला मी समर्थ आहें.

**बाळा०**—( एक उसासा टाकून ) मग आता बोलणंच खुंटलं ! बरं, तूं चहा घेतेस ना ?

**नीला०**— नुसतं गार पाणी द्या झालं. कोण उकाडा होतो आहे हा !

**बाळा०**— (त्यांचा चेहरा उतरून गेला आहे.) मग सरबत घे. ( रमाबाई

आंत जातात व थोड्या वेळाने सरबताचे पेले घेऊन येतात.)

**बाळा०**— बरं, विमलेचं तरी करायचं आहे का लग्न ?

**नीला०**— (सरबताचा पेला तोंडाला लावून) तें तिला आणि आईला विचारा ! पण मला तरी असं वाटतं की, ती अजून लहान आहे.

**बाळा०**—(हसत) मोठी झाल्यावर तिलाहि कान फुटायचे तुझ्या-सारखे !

**नीला०**— मोठी झाल्यावर जमवील ती आपलं लग्न हवं तर—

(इतक्यांत दारावर घंटा वाजते. तिघेंहि दाराकडे पाहतात. व्हरांड्यांत अविनाश दिसतो. त्याचा उमदा चेहरा व कुरळे केस त्याच्या देखणेपणांत भरच टाकीत आहेत. सायंकाळच्या वाऱ्याने त्यांच्या एकदोन बटा उडत आहेत. त्या फारच आकर्षक आहेत. त्याच्या चेहऱ्यावर नेहमीचेंच मोहक हास्य चमकत आहे.)

**नीला०**— (एकदम उठून) कोण ? अविनाश ? (तिच्या चेहऱ्यावर एकदम आनंद चमकतो.)

**बाळा०**— (उठून व्हरांड्याकडे जात) यावें महाराज ! (नीलेकडे लक्ष जाऊन) मी म्हटलं नाही तुझ्या ओळखीचे आहेत म्हणून ते ?

**नीला०**— (अत्यंत आनंदाने हसून) म्हणजे? अविनाश ! बाळासाहेब—

**बाळा०**— (हसून) ह्यांच्याविषयीच तर सांगत होतों तुला आत्ता ! परवा मला भेटले होते समुद्रावर, तेव्हा त्यांनीच हें काम करायला सांगितलं. म्हटलं, करीन मी. नीला मला मुलीसारखीच आहे. बाकी मीहि त्यांना सुचवलं होतंच की, तूं तशी लग्नांतल्या मध्यस्थीच्या विरुद्ध आहेस म्हणून. कारण मागला धारपांविषयीचा अनुभव होताच मला. पण ते म्हणाले, 'विचारून तर पहा—माझी ओळख आहे तशी.'

**नीला**— (अविनाशच्या सुंदर डोळयांकडे बघून) पण बाळासाहेबांनी

नांव तरी सांगायचं कीं नाही मला ?

**बाळा०**—(रमाबाईकडे बघून) नांव कसा बुवा सांगूं? नांव ऐकून घ्यायला तरी तूं तयार होतीस का?

**नीला**—(हसत) मला हो काय माहिती की, ते अविनाश असतील म्हणून! अन् काय हो अविनाश, तुम्हांला तरी मध्यस्थीची काय जरूर वाटली?

**अवि०**—(तिच्या लांब वेणीकडे पाहून) तुम्हांला विचारायचा मला धीर होईना. असं वाटे की, एखाद वेळेला तुमची माझ्याविषयींची भावना मैत्रीचीच असायची! एकदोनदा मी प्रयत्न केला, पण तुमच्याशीं प्रश्न काढायची वेळ आली की माझ्या तोंडांतून शब्दच फुटायचा नाही! शेवटीं म्हटलं बाळासाहेबच हें काम करूं शकतील!

**बाळा०**—(हसत) आणि अविनाश, मी आपलं काम बजावलं बरं का!

**अवि०**—(नीलेच्या डोळयांकडे पाहून) बरं– मग ?

**बाळा०**—(डोळे मिचकावून) ती नाहीच म्हणते मुळीं!

**नीला०**—(हसत) हें हो काय बाळासाहेब! मी अविनाशना हो कधी नाही म्हटलं? (अविनाश नीलेकडे पाहतो. त्याच्या डोळयांत आनंद भरलेला आहे.)

**बाळा०**— पाह्यलंस ना नीला? म्हाताऱ्या माणसांची जरुरी लागते ती अशी!

---

जुलै १९३६

## प्रवेश पहिला

( एका जुन्या वाड्यांतील दिवाणखाना. भिंतीवर हिरवा रंग देऊन खाली तांबडा पट्टा ओढला आहे. तक्तपोशीला रंगीत झुंबरें लावलेलीं आहेत. एका ईझीचेअरवर नानासाहेब वर्तमानपत्र वाचीत पडले आहेत. त्यांचा गौर वर्ण, रुबाबदार चेहरा व उंच शरीरयष्टि यांवरून ते चांगल्या खानदानीच्या घराण्यांतील दिसतात. भिंतीवरील मोठ्या घड्याळांत नवाचे ठोके पडतात. इतक्यांत दारावर टक्टक् असा आवाज होतो. नानासाहेब चष्म्याच्या भिंगांतून वर पाहतात, तों त्यांचे चिरंजीव वसंतराव आंत प्रवेश करतात. )

**नानासाहेब—** Come in.

( वसंतराव नानासाहेबांच्या जवळील एका कोचावर बसतात. त्यांचा चेहरा पाहिला असतां नानासाहेब पंचविशीच्या सुमारास कसे दिसत असतील, याची पूर्णपणें कल्पना येण्यास हरकत नाही. त्यांनी आपले केस चापूनचोपून बसविले असून परीटघडीचा शर्ट व परीटघडीचा पायजमा पेहेरला आहे. )

**वसंत—** ( वर्तमानपत्राकडे पहात ) केट्याला अजूनहि धरणीकंप होतोच मधून मधून, नाही ?

**नाना०—** ( वर्तमानपत्र बाजूस सारून ) हो, वाचलं आताच ! हिमालया-

च्या पोटांत कांहीतरी प्रचंड खळबळ चालली असली पाहिजे.

**वसंत**— हो, असाच बहुतेकांचा तर्क आहे. (पुन्हा स्तब्धता पसरते.)

**नाना०**— ( एकदम आठवण झाल्यासारखें करून ) हं मग ? पाहणार ना ती मुलगी ?

**वसंत**— ( त्या वर्तमानपत्राकडे उगीचच बघत ) नाही.

**नाना०**— ( आश्चर्यानें ) कां ?

**वसंत**— ( नानांच्या दृष्टीला धैर्यानें नजर लावून ) कारण —नाना, मी दुसरी एक मुलगी पसंत करून ठेवलेलीच आहे !

**नाना०**— ( पुन्हा वर्तमानपत्रांत डोकें खुपसून ) हं !

**वसंत**— ती आपल्या पसंतीला उतरेल अशी खात्री आहे. ( नानासाहेब वर्तमानपत्रांतून त्याच्याकडे प्रश्नार्थक नजरेने पाहतात. ) ती एकुलती एक मुलगी आहे. (वसंत आपल्या बोलण्याचा अनुकूल परिणाम झाला असावा ह्या अपेक्षेने नानांकडे पाहतो. )

**नाना०**— ( वर्तमानपत्रांतून डोकें बाहेर न काढतां ) बाप श्रीमंत आहे का पण ?

**वसंत**— मी कांही तिला असं विचारलं नाही. पण एकंदरींत तिच्या राहणीवरून वगैरे ती चांगलीच श्रीमंत असावी असं दिसतं.

**नाना०**— कुठे राहते ती ?

**वसंत**— हुजूरपागेच्या बोर्डिंगांत.

**नाना०**— हं ! मग तिच्या वडिलांचा पत्ता आण मागून !

**वसंत**— वडील नाहीतच तिला !

**नाना०**— ( एकदम रागाने व आश्चर्याने ) म्हणजे ?

**वसंत**— तिचे आई व वडील लहानपणींच वारले, पण तिच्या वडि-

लांची खूप इस्टेट आहे. ती ट्रस्टींच्या ताब्यांत आहे.

**नाना०**— ( जरा जीव खाली पडल्यावर ) कोण ट्रस्टीज् आहेत ?

**वसंत**— मी नाही बुवा विचारलं ! कारण तिला वाटायचं की मी तिच्यापाशी लग्नाची मागणीच घालतों आहें.

**नाना०**— Strange ! असं वाटण्याची काय जरूर ! तूं काय पोरक्या दरिद्री पोरीशीं लग्न करणार आहेस ? आणि तिला तरी तिच्या पैशा-अडक्याची चौकशी न करतां कोण करणार ?

**वसंत**— छे, छे ! नाना, ती इतकी सुंदर आहे की, पैशाशिवाय—

**नाना०**— ( पुढे ऐकण्याची इच्छा नसल्याने ) समजलों, समजलों. ( ते पुन्हा वर्तमानपत्र वाचण्यास सुरवात करतात. )

**वसंत**— मग आपला ' कन्सेंट ' धरूं ना ?

**नाना०**— ( कांही वेळ ते वर्तमानपत्र-वाचन तसेंच चालू ठेवतात. नंतर थोड्या वेळाने ) पुरेसे पैसे असतील तिच्यापाशी तर ! आपल्याला तिच्या पैशांची जरूर आहे असं नाही. पण तूं जर अनाथ मुलीशीं लग्न केलंस तर आपल्या इतमामाला धक्का बसेल ! शिवाय तुझ्या आईचा तूं एकुलता एक आहेस, हें विसरूं नकोस. तुझ्या लग्नांत तिच्या मानपानाच्या हौशी पूर्ण झाल्या पाहिजेत. ( कोचावरून उठतात. )

**वसंत**— ( रागीट स्वरांत ) ठीक. मी ट्रस्टीजचा पत्ता आणतों, मग तर झालं ना ?

**नाना०**— ( वर्तमानपत्रांत डोकें खुपसून ) जर ती खरोखरच श्रीमंत असेल तर माझी कांही हरकत नाही ! ( वसंत दिवाणखान्यांतून बाहेर जातो. )

---

## प्रवेश २ रा

( हुजूरपागेंतील क्रीडांगण. अंधार पडावयाची वेळ झाली असल्याने सर्व खेळणाऱ्या मुली तेथून गेलेल्या दिसत आहेत. एकटी लीला प्लेशेडच्या एका टोकापाशी उभी आहे. तिच्या हातांत एक पुस्तक आहे; पण तें वाचण्याविषयी तिला फारशी आस्था दिसत नाही. प्लेशेडच्या टोकापासून हुजूरपागेच्या मुख्य दरवाजाकडे ती वाकून पाहते. पण पुन्हा तिची निराशा होते. तिचे डोळे पाण्याने डबडबून येतात. तिचें वय सतरापेक्षा अधिक नसावें. बांधा उंच व सडपातळ असून चेहऱ्यावरील बालिशता अजून कायम आहे. तिचे डोळे पाणीदार आहेत व त्यावरून ती साधारण मुलींपेक्षा अधिक बुद्धिवान् असावी, असा बघणाराचा ग्रह होतो. ती एक निळसर रंगाची साडी नेसली असून त्याच रंगाचा जंपर घातलेला आहे. केसांची लांब वेणी तिच्या पाठीवर रुळत आहे. )

**लीला**— ( डोळे पुशीत ) आजसुद्धा आले नाहीत ते ! आज आठ दिवस झाले त्यांना येऊन. मी आपली रोज त्यांची वाट पाहतें. गेल्या रविवारींच तर ते येऊन त्यांनी मला विचारलं. तेव्हाचं त्यांचं तें हसणं, बघणं सगळं खोटंच का ? मला मात्र कांही सुचत नाही तेव्हापासून. वर्गात गेलें तरी माझी तंद्री जात नाही. बाईनी प्रश्न विचारला तर मी नुसती वेड्यासारखी उत्तर न देतां तटस्थ उभी राहतें. सारखा त्यांचा चेहरा, त्यांचं हास्य हीं मला दिसत असतात. त्यांचे शब्द तर माझ्या कानांत घुमत असतात. करूं तरी काय मी ? कीं त्यांनी माझी गंमतच केली ? पण छे ! त्यांचे ते डोळे— माझ्याकडे लागलेली त्यांची ती स्थिर नजर मी कधीच विसरणार नाही. ती नजर खात्रीने लबाड नव्हती. ( पुस्तकांतून एक पत्र काढून वाचीत ) तुला भेटल्याशिवाय मला एक दिवसहि करमत नाही असं म्हणणारे तेच का ? ( तिच्या गालांवरून अश्रु-

धारा वाहूं लागतात. ) कीं त्यांनी माझी गंमतच केली ? पण मी काय करूं ? मला त्यांचा रागहि येत नाही. मला कांही अभ्यास, खेळ, कांही कांही करावंसं वाटत नाही ! एकटं एकटं बसून रडावंसं वाटतं ! ( रडूं लागते; दोन मिनिटें जातात. इतक्यांत ' लीला ' ' एऽ लीला ' अशा हाका ऐकूं येतात. लीला दचकून वर बघते. दुरून हाक मारीत येणाऱ्या समवयस्क विमलला पाहतांच अश्रु पुसते व तिच्याकडे जाऊं लागते. )

**विमल**— ( ती जवळ येतांच ) अगबाई लीले. तुझी तिकडं वाट बघताहेत. जेवायची घंटा ऐकली नाहीस का तूं ? ( तिच्या डोळयांकडे पहात ) अय्या, तूं रडत कां होतीस ? काय झालंय् तरी तुला आताशा ?

**लीला**— ( वरकरणी हसण्याचा प्रयत्न करीत ) कांही नाही गऽ ! मला किनी हल्ली घरची फार आठवण येते.

**विमल**— ( तिच्याकडे निरीक्षण करून पहात ) हो ! मलासुद्धा असंच व्हायचं गऽ पहिल्यापहिल्यानं. मग एकदम सवय झाली म्हणजे— ( लीला हसते. विमल तिच्या हातांत हात घालून तिला घेऊन जाते. )

---

## प्रवेश तिसरा

( नानासाहेबांच्या घरांतील त्यांची खोली. नानासाहेब टेबलापाशी कांही लिहीत बसले आहेत. वसंत दारावर टिक्टिक् न करतां प्रवेश करतो. त्याच्या चेहऱ्यावर उद्विग्नता पसरलेली दिसत आहे. केसांची काळजी न घेतल्याने ते डोक्यावर पसरलेले आहेत. डोळयांभोवती पसरलेलीं वर्तुळें व चेहऱ्यावरील त्रासिक भाव यांवरून आदली रात्र जागरणांत गेल्यासारखी दिसत आहे. )

**वसंत**—( एकदम वडिलांच्या जवळ जाऊन ) बाबा—

**नाना०**—( कागदपत्रांतून डोकें बाहेर काढून ) काय ?

**वसंत**— मला त्या मुलीशीं लग्न करायचं नाही—

**नाना०**—( आपण हें भविष्य केलेंच होतें अशा आविर्भावानें ) अस्सं ?

**वसंत**—( नानासाहबांकडे त्याचें लक्ष नाही. चेहऱ्यावर असलेली उद्विग्नता व्यक्त करण्याचा प्रयत्न करीत ) ती इतकी पदोपदीं खोटं बोलणारी आहे हें माहीत असतं तर—

( नानासाहेब त्याच्याकडे हसत पाहतात. त्यांच्या आविर्भावावरून त्यांना अत्यंत आनंद होत असावा असें दिसतें. )

**नाना०**— असो, तुला अखेर एकदाचे शहाणपणाचे बोल पटले म्हणायचे !

**वसंत**—( टेबलावरील एका कागदावर दृष्टि रोखून ) आपल्या वाड्यांत त्या मिस् गोखले राहतात—त्या हुजूरपागेंत मास्तरीण आहेत ! परवा मी सहज त्यांच्याकडे गेलों होतों. त्या आंत चहा आणायला गेल्या—म्हणून मी आपला त्यांच्या टेबलावरील पुस्तकें बघूं लागलों. तिथं एक शाळेचं रजिस्टर पडलं होतं. मी सहज तें हातांत घेतलं—वर पाहिलं तों तें सहावीच्या वर्गाचं होतं. लीला हुजूरपागेंत सहावींतच आहे, त्यामुळे मी कुतूहलानं उचललं व त्यांत लीलेचं नांव आहे कां, म्हणून बघूं लागलों. नांव सापडतांच मला आनंद झाला. त्यांत तिची प्रगति असली तर पहावी म्हणून मी बघूं लागलों तों 'not satisfactory' असा शेरा ! मला जरा नवलच वाटलं. कारण लीला आपला अभ्यास हल्ली होत नाही नी म्हणून आपला पहिला नंबर जाणार, अशी कुरकुर करीत असे. अर्थात् ती लाडीकपणानंच. कारण 'तुला अभ्यास माझ्यापेक्षा अधिक

वाटावा ना ? ' असं मी तिला म्हटलं की, ती आपलं प्रेम उघड करून सांगत असे— नंतर मी पुढे तिच्या नांवामागील शेरे पाहूं लागलों, तर ती ' फ्री ' आहे, असं मला दिसून आलं !

**नाना०**— ( तुच्छतापूर्वक हसून ) हं !

**वसंत**— ( त्यांच्याकडे न बघतां आपल्याच तंद्रींत ) मिस् गोखले बाहेर आल्या तेव्हा मी त्यांना ह्याबद्दल विचारणार होतों; पण इतक्यांत त्यांच्याकडे कोणी पाहुणे आले. मागून मुद्दाम जाऊन मी विचारलं नाही; कारण माझी खात्री झालीच होती. उगीच आपलं हसं त्यांच्यासमोर कशाला करा ? चकचकीत जर तिच्या नांवासमोर ' free ' आणि ' not satisfactory ' असे शेरे लिहिले होते ! एवढं मात्र खरं की, एका मुलीनं मला पुरं बनवलं !

**नाना०**— मी तुला म्हटलं नाही की, तिच्या बोलण्यावर जाऊं नकोस म्हणून ? तूं तर त्या ' ट्रस्टी ' चा पत्ता द्यायला तयार होईनास ! त्यांचं तरी कुठं उत्तर आलं आहे ? ट्रस्टी नसेलच कोणी, तर उत्तर कसलं येतं आहे ?

**वसंत**— ( कागदावरील नजर दूर न करतां संतापाने ) ती गरीब म्हणून मला लग्न मोडायचं असं बिलकूल नाही ! ( नाना दचकून त्याच्याकडे बघतात. ) पण आपली बुद्धि उत्तम आहे, आपण लक्षाधिशाची मुलगी आहों, अशा खोट्या वल्गना करणाऱ्या मुलीचा मला तिटकारा वाटतो ! तिनं आधीच सांगायचं होतं की, मी गरीब आहें ! अशीं खोटीं ढोंगं करायचं काय कारण ?

**नाना०**— ( हसून ) I am glad. बरं झालं, तुझ्या डोळ्यांवरची झापड इतक्या लवकर दूर झाली !

**वसंत**— ( डोळ्यांसमोर तिची प्रतिमा आणून ) इतकी दिसायला गोड नि निष्कपटी मुलगी वर्तणुकींत अशी दुष्ट असेलसं कुणाला वाटलं तरी असतं ?

**नाना०**— ( तिचें सौंदर्य पुन्हा त्याला जाळ्यांत पाडील या भीतीने ) जाऊं दे — जाऊं दे आता ! तिला विसरायचं तेवढं आता तुझ्या हातीं आहे. आयुष्यांत असे प्रसंग येतातच आणि तेव्हाच कळतं की, चमकतं तेवढं सोनं नसतं. हरकत नाही ! लवकर तुझे डोळे उघडले ! आता आपला तूं वडील माणसांवर भरवसा टाकून लग्न करून मोकळा हो. तुझा स्वभाव नाहीतरी थोडा उतावीळच—झालं हें उत्तमच झालं !

**वसंत**—( वडिलांकडे प्रथमच बघून ) No, that's not possible. सध्याच्या स्थितींत लग्नाचा विचारच मला असह्य होईल—

**नाना०**— ( मुलगा हल्लीच्या खवळलेल्या मनःस्थितींतून शांत झाल्यावर आपोआपच ताळ्यावर येईल, ह्या भरवशाने ) ठीक आहे— ( ते पुन्हा कागदपत्रांत डोकें खुपसतात. वसंत खोलीबाहेर जाऊं लागतो. )

---

## प्रवेश ४ था

( वसंताच्या खोलीकडे जाणारा जिना. लीला त्यावरून भीत भीत जात आहे. ती एक पांढरेंशुभ्र लाल किनारीचें पातळ नेसली असून, तिचे केस तिच्या कपाळावर नाचत आहेत. तिच्या चेहऱ्यावरून ती खूप रडल्यासारखी दिसत आहे. ‘ झंझावातानंतर गळून गेलेल्या कमलिनीसारखी ती दिसत आहे, ’ असें कोणी तिला पाहून म्हटल्यास तें तिचें हुबेहूब वर्णन होईल. )

**लीला**— ( दारापाशी उभी राहून भीत ) ‘ माझ्या खोलीचा जिना स्वतंत्र आहे—तूं एकदा जरूर ये, ’ असं ते कितीदा म्हणाले असतील; पण तेव्हा मी गेलें नाही—आणि आजच्या प्रसंगाला मी येत आहें आपण होऊनच ! ( थोडा वेळ थांबून ) काय म्हणतील ते मला इथं पाहून ? अन् कांही रागाने बोलले तर ? उगीच आलें मी इथं वेड्यासारखी ! परत जाऊं का ? पण गेल्यावर तरी काय ? माझं मन विचार करून वेडं व्हायच्या बेताला आलं आहे ! त्यापेक्षा कांहीतरी सोक्षमोक्ष लावून टाकलेला बरा ! ( ती दारावर टिक्‌टिक् करते. )

**वसंत**— ( दार उघडतो. लीलेला पाहतांच आश्चर्यातिरेकाने ) कोण ? लीला ? ( लीला त्याच्याकडे बघते. वसंताची नजर तिच्या मूर्तीवर खिळून राहते. तिच्या चेहऱ्यावरील पूर्वीचें अस्फुट हास्य लयाला जाऊन त्याऐवजीं गंभीरता पसरलेली दिसत आहे. डोळे खोल गेल्यासारखे दिसत असून, ओठांतून करुण भाव व्यक्त होत आहे. एक क्षण लीलेला पाहण्यांत वसंत तल्लीन होतो. तिच्या चेहऱ्यावरील दुःखित भाव पाहतांच त्याच्या हृदयाला पीळ पडतो. )

**वसंत**— किती बदललीस तूं लीले ?

( पण त्याच्या शब्दांनी एरवी प्रफुल्लित होणारी लीला अधिकच दुःखी दिसूं लागते. वसंत भानावर येतो. मध्यंतरीं झालेला परकेपणा पुन्हा त्या दोघांमध्ये डोकावूं लागतो. ओठ दाबून व कपाळाला किंचित् आठ्या घालून वसंत म्हणतो,– ‘ आंत ये. ’ लीला कांही न बोलतां मुकाट्याने आंत जाऊन खुर्चीवर बसते. एरवी आपल्या मनोहर स्मिताने सर्व वातावरण रम्य करणारी लीला स्वस्थ बसल्याने वसंताला चुकल्यासारखें होतें; पण पुन्हा तो भानावर येतो. ही वरून निर्व्याज व निष्पाप दिसणारी मुलगी लबाड आहे, हें तो आपल्या मनाला सांगतो व वरून गंभीर भाव धारण करतो. )

**वसंत**— ( तिच्याकडे न बघतां ) आज इकडं कुठं आली होतीस

वाटतं ?

**लीला**— नाही.

**वसंत**— मग इकडं कुठं ?

**लीला**— इथंच मुद्दाम आलें.

**वसंत**— कांही काम आहे ?

( एकदम हुंदक्याच्या आवाजाने तो तिच्याकडे पाहतो. तों इतका वेळ रडें यावयाची वाट पहात असलेली लीला अखेरीस स्फुंदून स्फुंदून रडत असल्याचें त्याच्या दृष्टोत्पत्तीस येतें. क्षणभर त्याचें मन द्रवतें; पण ह्या मुलीच्या असल्या कांगाव्यांना दाद द्यावयाची नाही, असा निश्चय करून तो स्तब्ध राहतो. )

**वसंत**— ( थोड्या वेळाने पुन्हा ) काम आहे का कांही आपलं माझ्याकडं ? ( तिचें रडें थांबतें. )

**लीला**— ( त्याच्या दृष्टीला दृष्टि भिडवून ) तुम्ही माझ्यावर इतके रागावलांत कां ? मी तुमचा काय अपराध केला ? ( पुन्हा तिला हुंदका येतो. )

**वसंत**— रागावलों नाही बुवा ! रागावण्याचा मला काय अधिकार ?

**लीला**— ( त्याच्या डोळयांकडे बघत ) तुमचा कांही गैरसमज झालेला दिसतो आहे. त्या दिवसापासून तुम्ही एकदाहि कां आला नाही ?

**वसंत**— नाही आलों ! वेळ नाही झाला—

**लीला**— ( खाली पहात ) मी किती वाट पाहिली—

(वसंत एकदम उभा राहतो व तिच्या जवळ जाऊन रागाने उद्गारतो)- लीले !

( लीला त्याच्याकडे एकदा बघते, पण त्याच्या रागीट डोळयांना नजर भिडविण्याचें धैर्य न झाल्याने ती पुन्हा खाली बघूं लागते. )

**वसंत**— लीले, माझ्या नजरेला नजर भिडवण्याचं धैर्य तुला आहे ? ( लीला भीतीने कांहीच बोलत नाही. ) नाही ! कुठून असणार ? वरून

गोड रूपं धारण करणाऱ्या तुम्ही बायका. आपलं कपटी मन खरोखरच उत्तम तऱ्हेनं झाकून ठेवतां ! (लीला त्याच्याकडे आश्चर्याने बघते.) पण मी आता पुन्हा तुझ्या चोचल्यांना भुलणार नाहीं, एवढंच लक्ष्यांत ठेव. (शेवटचें वाक्य तो स्वतःशींच पुटपुटतो. ते शब्द बोलतांना त्याच्या हृदयाला होणाऱ्या वेदना त्याच्या चेहऱ्यावर स्पष्ट होतात.)

**लीला**— (आता आपल्याविषयीं ह्यांचा कांहीं गैरसमज झाला आहे, असें ध्यानांत येऊन) पण मी केलं तरी काय ?

**वसंत**— (तिच्याकडे न बघतां) स्वतःलाच विचार !

**लीला**— (त्याच्या कठोर शब्दांनी तिचें मन कमालीचें खट्टू होतें. पण त्यामुळे इतका वेळ वाटत असलेला त्याजविषयींचा तिचा आदर एकदम नाहीसा होतो व ती शांत होऊन म्हणते.) आता आलं माझ्या लक्षांत ! पुरुषजातीवर विश्वास कधी ठेऊं नये असं आमच्या बाई म्हणतात, तें एकंदरींत खोटं नव्हे.

**वसंत**— (क्षणभर तो आश्चर्यचकित होतो, पण पुन्हा रागाने) करून सवरून टेंभा मिरवायची बायकांना हौसच असते !

**लीला**— (एकदम खुर्चीवरून उठून) तुम्ही असं म्हणणारच ! एखाद्या मुलीचा कंटाळा आला म्हणजे तिच्यावर दोष लादून सहीसलामत सुटण्याचा पुरुषांना जन्मसिद्ध हक्कच आहे. (ती चालूं लागते.)

**वसंत**— (तिच्या या धीटपणाने व ते शब्द बोलतांना चमकत असणाऱ्या तिच्या चेहऱ्यावरील तेजाने तो थक्क होतो. ती घराबाहेर पडणार, तोंच तिला तो हाका मारतो.) लीले !

**लीला**— (मागे वळून पाहते. झालेल्या अपमानाने व वसंताच्या कठोर वर्तनाने तिच्या चेहऱ्यावरील सौम्यपणा पार मावळलेला आहे.)

**वसंत**— लीले, जरा इकडे ये. मला तुझ्याशीं बोलायचं आहे. (त्याच्या

चेहऱ्यावरील कठोरपणा बराच कमी झालेला पाहून ती परत फिरते व त्याने दाखवलेल्या खुर्चीवर बसते. )

**वसंत**— लीले, तूं गरीब आहेस, हुषार नाहीस, हें मला सांगितलं असतंस तरी माझं तुझ्यावरील प्रेम कमी झालं नसतं !

**लीला**— ( आश्चर्याने ) काय ?

**वसंत**— ( तिच्याकडे लक्ष न देतां ) पण तुझ्या खोटं बोलण्यानं मात्र मला तुझ्याविषयी पूर्ण तिटकारा आला आहे.

**लीला**— ( आश्चर्याने ) मी काय खोटं बोललें ?

**वसंत**— ( तिच्या आश्चर्याने विस्फारित झालेल्या डोळ्यांकडे शांतपणें बघत ) 'मी लक्षाधीशाची मुलगी आहें नी माझा वर्गात पहिला नंबर आहे,' असं सांगून माझ्यावर छाप मारण्याची तुला बिलकूल जरूर नव्हती.

**लीला**— ( एकदम जागेवरून उठून ) पण मी यांत खोटं काय बोललें ?

**वसंत**— अगदी प्रत्येक शब्द खोटा बोललीस !

**लीला**— कोण म्हणतं ?

**वसंत**— मिस् गोखले तुझ्या क्लासटीचर आहेत ना ?

**लीला**— हो—

**वसंत**— मग झालं तर !

**लीला**— त्यांनी असं सांगितलं ?

**वसंत**— त्यांनी सांगितलं नाही, मी त्यांच्या रजिस्टरवर पाहिलं.

**लीला**— काय लिहिलं होतं त्याच्यावर ?

**वसंत**— ( तिच्याकडे तिरस्काराने बघून ) जसं कांही तुला माहीतच नाही ! त्याच्यावर तुझ्या नांवापुढे free आणि progress not satisfactory म्हणून लिहिलं होतं !

**लीला**— ( आश्चर्यातिरेकाने ) छे ! शक्यच नाही !

**वसंत**— ( हिचा आरोप शाबीत करावयाचा या उद्देशाने ) चल मग मिस् गोखल्यांकडे.

**लीला**— ( दचकून ) त्यांच्याकडे ? पण त्या काय म्हणतील ?

**वसंत**— ( थंडपणें हसून ) आता कां मागे सरलीस ?

**लीला**— तुम्हांला काय वाटतं ? खरं बाहेर येईल म्हणून मी मागे सरतें असं ? तर मग चलाच.

( तो मुकाट्याने उठतो व एक शीळ घालीत जिना उतरूं लागतो. ती त्याच्या मागे जाते. जिना उतरून तो मिस् गोखल्यांच्या दरवाजापाशी येऊन पोचतो. लीलाहि तेथे जाऊन उद्विग्नतेने उभी राहते. तो टिक्‌टिक् करतो—उत्तर येई-पर्यंत दोघेंहि एकमेकांशीं न बोलतां उभीं राहतात. थोड्या वेळाने एक गडी दार उघडतो. )

**गडी**— हां जी.

( वसंत मुकाट्याने दारांतून आंत शिरतो व एका खुर्चीवर अधिष्ठित होतो. लीलेला उद्देशून तो कांहीच म्हणत नाही. ती थोडा वेळ बाहेर उभी राहते व नंतर तीहि खोलींत वसंतापासून दूर असणाऱ्या एका खुर्चीवर बसते. दोघे एकमेकाकडे बघत नाहीत. थोड्याच वेळांत मिस् गोखले आंतल्या खोलींतून येतात. )

**मिस् गोखले**— ओ हो, आज इकडं कुठं ? ( लीलेकडे बघून ) अन् आमच्या लीलाबाईहि कशा इकडे आत्ता ?

( लीला त्यांच्याकडे पाहून किंचित् हसते. पण तिच्या चेहऱ्यावरील दुःखाची छटा मिस् गोखल्यांच्या सूक्ष्म दृष्टींतून सुटत नाही. )

अन् काय लीला, तुला अलीकडं झालंय् काय ? वर्गांतहि अगदी शून्य नजरेनं बसलेली असतेस ! पूर्वीचा उत्साह सगळा गेला तुझा हल्ली ! काय, काय होतं आहे तुला ? ( लीला खाली बघते. )

**वसंत**— ( एकदम विषय टाळण्यासाठी ) काय चाललं होतं ? शाळेचं काम ?

**मिस् गोखले**— ( हसून ) हो ! हल्ली शाळेचं काम त्या पलीकडल्या खोलींतच करतें. बरं असतं जरा शांत ! अन् कोणी आलं गेलं तरी त्रास होत नाही.

**वसंत**— ( हसून ) त्रास म्हणजे ? आमचा— नाही— माझा त्रासच झाला असेल आता ?

**मिस् गोखले**— तसं नाही हो ! पण परवा बघा तुम्ही आलां होतां ना– त्या दिवसाची गोष्ट ! तुम्ही यायच्या आधी मंडळी आली होती. नेहमीचीच मंडळी—लवकर उठायची नाहीत अन् रजिस्टर तयार करण्याची शेवटची तारीख म्हणून तसंच त्यांच्याशीं बोलतां बोलतां रजिस्टर तयार केलं ! पण काय उपयोग ? आज आमच्या हेड मिस्ट्रेसनी परत केलं !

**वसंत व लीला**— ( एकदम ) कां ?

**मिस् गोखले**— ( त्यांच्या उत्कंठेने जरा आश्चर्य वाटून ) तशी कांही भयंकर चूक झाली नाही !

**वसंत**— ( उत्सुकतेने ) काय झालं पण ?

**मिस् गोखले**— ( लीलेकडे पाहून हसत ) कांही नाही ! ह्या लीलेच्या नांवापुढे चुकून वरच्या ओळींतील शांता गायकवाडचे सगळे शेरे घातले. त्यामुळे लीलेचे तिच्या खालच्या ओळींतल्या मुलीला पडले. अन् मग सगळंच चुकलं !

( लीला एकदम वसंताकडे बघते. वसंत तिच्याकडे बघतो. त्याच्या डोळ्यांत

आनंद पूर्णपणें भरलेला आहे, पण लीलेच्या नजरेला नजर भिडविणें त्याला शक्य नाही. )

**वसंत**—( एकदम खुर्चीवरून उठून ) माफ करा मिस् गोखले ! मला आता आठवण झाली—माझा एक स्नेही येऊन बसला असेल. तीनची अपॉइंटमेंट दिली होती त्याने. ( तो उठतांच लीलाहि उठते. )

**मिस् गोखले**—( त्या उभयतांकडे पाहून हसतात. त्यांचें कांही रहस्य असावें, बहुतेक वडील बाहेर जाईपर्यंत लपण्यास आपलें घर या दोघांनी गाठलें असावें, असा त्या तर्क करतात व आपल्या सुस्वभावानुरूप त्यांना त्यांच्या भेटींत अडथळा करूं इच्छीत नाहीत. ) ठीक आहे ! ( लीलेकडे पाहून ) अभ्यासांत मात्र तूं खाली जात चालली आहेस हं ! ती हिरा तुझ्या किती खाली असे, पण ती आता तुला मारूं लागली आहे प्रत्येक विषयांत !

**वसंत**—( एकदम लीलेबद्दल ) हो हो ! ती आता केव्हाच त्या हिराला मागे टाकील ! ( लीला हसते. वसंत व लीला बाहेर जातात. मिस् गोखले दार लावतात. )

**वसंत**—( बाहेर पडतांच ) लीले, मला क्षमा करशील ना ? मी तुझा घोर अपराधी आहें !

**लीला**—( त्याच्या सुंदर डोळ्यांकडे दृष्टि जातांच राग जाऊन लटक्या रागाने ) हो हो ! मी जर तुमच्या जागीं असतें अन् मला कोणीहि कांहीही सांगितलं असतं तरी कध्धी संशय आला नसता तुमचा !

**वसंत**—( करुण स्वरांत ) पण मी तरी कोणाच्या बोलण्यावर का विश्वास ठेवला ? त्यांच्या रजिस्टरवर पाहिल्यावर कोणाचा विश्वास नाही का बसणार ? अन् त्यांतून मिस् गोखल्यांसारखी व्यवस्थित बाई !!
( ते वसंताच्या खोलीपाशी पोचतात, तोंच त्याचे वडील हातांत कागदपत्रें घेऊन खोलीजवळ येत असलेले दिसतात. )

**वडील**— ( लीलेला पाहतांच डोळ्यांवरील चष्मा खाली करतात व नीट न्याहाळून पाहतात. तिचें सुंदर रूप पाहतांच खुषीने वसंताकडे पाहून ) ह्या कोण—लीला—लीलाबाई ? ( लीला लाजून खाली पाहते. )

**वसंत**— ( खोली उघडीत आनंदाने ) हो बाबा ! अन् माझा गैरसमज झाला होता—

**वडील**— ( कागदपत्राकडे पहात ) हो, तेंच सांगायला आलों होतों मी तुला ! ( लीलेकडे पाहून ) ह्यांच्या ट्रस्टींकडून आताच उत्तर आलंय् मला ! ( वसंत ओशाळून लीलेकडे पाहतो. )

**वसंत**— लीले, क्षमा कर. मी ह्याच्या अगदी विरुद्ध होतों.

**वडील**— पण त्यांत काय वाईट झालं ? समज, जर ह्यांनी येऊन प्रत्यक्ष गैरसमज दूर केला नसता, तर आज त्या पत्रांनीच तो दूर झाला असता कीं नाही ? हा—हा—हा ! अरे पण आंत चला ना ! लीलाबाई किती वेळ बाहेरच उभ्या आहेत ! आपल्याला अगदी अन्मॅनर्ली ठरवतील ना त्या ! ( ते आंत शिरतात. वसंत लीलेकडे प्रेमपूर्वक पाहतो. तिची तिरकी नजर पाहिल्याबरोबर लीलेने आपल्याला क्षमा केलेली आहे, ह्या खात्रीने त्याच्या डोळ्यांत आनंद चमकूं लागतो. )

---

आक्टोबर १९३८

## प्रवेश पहिला

( बंडगार्डनवरील धरणाजवळील पायऱ्या. चारपांच तरुण मुले धरणाची शोभा पहात गप्पा मारीत उभी आहेत. पावसाळ्याचे दिवस असल्यामुळे दोघांनी अंगांत रेनकोटस् चढविले आहेत. )

**एक उंचेला विद्यार्थी**— ( सिगरेट दातांत दाबून काडी पेटवीत ) काय हो, सिगरेट ओढतां का ?

**दुसरा एक**—( खांद्यांवरील रेनकोट सावरीत ) हो हो ! ( पहिला दुसऱ्याला सिगरेट देतो. बाकीचेही त्यांना या कामांत मदत करतात. कांही वेळ कोणीच बोलत नाहीत. तोंडांतून सिगरेटचा धूर सोडीत नुसते उभे राहतात. )

**तिसरा**— ( शेवटीं एकदा शांतताभंग करीत ) काय हो, प्रधान, ह्या दिवसांत बोटिंग उगीचच बंद करतात, नाही का ?

**प्रधान**— कां ? आपल्याला स्फूर्ति झाली आहे वाटतं मरायची ?

**तिसरे गृहस्थ**— मरायची नाही. काव्यस्फूर्ति म्हणा पाहिजे तर. अगदीच बुवा आम्ही भित्रे लोक. आमचे प्रिन्सिपॉल तर आमच्यावर ताण. तेच कोळी लोक पहा ! समुद्राच्या लाटांत उठणाऱ्या होडींत प्रेम करायला कमी करायचे नाहीत. ( गाऊं लागतो. )

**झाला खुला समींदर, नाजुक होडीवर**
**लाटांचा धिंगा सुरू**
**ग सजणे, होडीला बघतो धरूं.**

**उंचेले तरुण**— ( गाणाऱ्याच्या पाठीवर थाप मारून ) वा वा, केळकर, तुम्ही तर अगदी कवीच बनलात.

**केळकर**— वा ! तुमचं मराठी वाङ्मयाचं ज्ञान मात्र अगदी अगाध दिसतं आहे. अहो राजश्री, हें मी केलेलं काव्य नव्हे.

**दुसरे**— ( सिगरेटची राख झाडीत ) केळकरांना एवढं काव्य येत असतं, तर काय हवं होतं !

( इतक्यांत एक नवीन तरुण पायऱ्या उतरून अगदी पाण्याजवळ सर्व लोकां-पासून दूर जाऊन उभा राहतो. )

**प्रधान**— (त्याच्याकडे एकदम लक्ष्य जाऊन ) ओ हो ! हा पहा दामले !

**इतर सगळे**— ( एकदम ) कोण ! दामले ? आज स्वारी इकडं कुठं झुकली ?

**प्रधान**— हो, माणसं जमतील तिथून हे पळच काढायचे ! म्हणून तर हे बंडवर कधीच दिसायचे नाहीत !

**केळकर**— या श्यामला एकदा बनवला पाहिजे बेट्याला.

**प्रधान**— ( त्याच्या हातावर टाळी देत ) वाहवा, काय सुंदर कल्पना ! खरंच बुवा केळकर, तुमचं डोकं लेखकाचं आहे. जरा प्रयत्न कराल, तर आज गचाळ भासणाऱ्या तुमच्या मॅगझीनमधील कविता खात्रीने सुंदर होतील.

**केळकर**— फार आभारी आहें आपला ! चला, अगोदर त्या शाम्या-ला गाठूं. ( श्यामकडे जात ) दामले—

**दामले**— ( त्याच्याकडे वळून पहात ) ओ हो ! प्रधान, केळकर,

नाडकर्णी, देसाई सगळेच आलेले दिसत आहेत.

**देसाई**— ( मिस्कीलपणें हसत ) हा आमचा रोजचाच क्रम आहे, दामले ! तुम्हांला एवढं नवल काय वाटलं ?

**नाडकर्णी**— अहो, त्यांना वाटणारच ! ते आले आहेत इथं पहिल्यानंच.

**केळकर**— ( दामलेपुढे सिगरेटकेस धरून ) ओढतां का सिगरेट ?

**दामले**— नको बुवा. माफ करा.

**प्रधान**— ( देसाईस हळूच ) फुकट मिळाली तरी ओढत नाही बरं का ?

**केळकर**— ( भिवया वर करून ) पण काय हो दामले, तुम्ही सिगरेटस्‌शिवाय कसे जगतां बुवा ?

**प्रधान**— आणि अगदी एकटे मित्राशिवाय कसे हिंडतां ?

**देसाई**— अरे कांही वेळां मित्रांचा सहवास त्रासदायक होतो, प्रधान !

**प्रधान**— ( भोळेपणाचा आव आणून ) तो कसा काय बुवा ?

**देसाई**— अगदीच बुवा भोळसर आहांत तुम्ही, प्रधान ! अहो, एवढं नाही का तुम्हांला कळत ?

**प्रधान**— म्हणजे !

**नाडकर्णी**— दोन मंडळींत तिसऱ्याची अडचण होते, प्रधान.

**प्रधान**— पण ह्यांच्याबरोबर कोण आहे ?

**नाडकर्णी**— ते दामल्यांनाच माहीत. ( सगळे हसतात. )

**केळकर**— काय दामले, लीला कामत कुठं आहे ?

**दामले**— ( त्यांच्या नकळत त्याच्या चेहऱ्यावर लाली चढते. ) मला कसं हें माहीत असणार ?

**नाडकर्णी**— तर तर ! काय आव आणतां ? जसं कांही आपण या गावचेच नाही !

**दामले**— अहो, मला काय तिची माहिती ?

**देसाई**— तुम्हांला नाही तर काय आम्हांला असणार ?

**दामले**— पण मला तरी तिची माहिती असण्याचा काय संभव ?

**नाडकर्णी**— वा, दामले !

**देसाई**— दामले, खरं सांगा, तुमची नि तिची ओळखही नाही का ?

**दामले**— ( लाजत ) ओळख आहे हो तशी.

**नाडकर्णी**— नुसती ओळखच आहे म्हणतां ?

**दामले**— हो.

**केळकर**— अहो, तो तिच्याशीं जास्तकमी बोलायला भितो ! ( सुस्कारा सोडून ) नुसती ओळखच आहे अजून !

**देसाई**— ( गंभीर चेहरा करून ) हरकत नाही दामले ! प्रेम करायला कांहीच हरकत नाही.

**दामले**— ( खिन्नपणें हसून ) तें कसं काय ?

**प्रधान**— ( नाडकर्णीला हळूच ) बनला बेटा. ओशाळला.

**देसाई**— अहो, मी सांगतों म्हणून ! माझी खात्री आहे त्याबद्दल. तुम्ही उगीच भितां !

**दामले**— ( अधीरता लपविण्याचा प्रयत्न करीत ) उगीच आपले थट्टा करता झालं !

**देसाई**— अहो, थट्टा कसली ?

**प्रधान**— हो. थट्टा कसली ?

**केळकर**— या जिव्हाळ्याच्या प्रश्नांत थट्टा उपयोगी नाही, देसाई.

**दामले**— तुम्ही मनापासून बोलतां आहांत का सगळे ?

**देसाई**— अर्थातच. ( केळकर व नाडकर्णी हळूच हसतात. )

**दामले**—( आशाळभूतपणें ) खरंच ! तुम्हांला असं वाटतं का ?

**देसाई**—( गंभीर चेहरा करून ) असं म्हणजे–

**दामले**— ( गोंधळून ) म्हणजे – म्हणजे—

**केळकर**— अहो, असं काय करतां देसाई ? असं म्हणजे—

**प्रधान**— तुम्ही सांगा, लीला कामतचं ह्यांच्यावर प्रेम आहे कीं नाही तें !

**देसाई**— आपली तर बुवा खात्री आहे.

**दामले**— कशावरून ?

**देसाई**— कशावरून कशाला पाहिजे ? आम्हांला एवढं का समजत नाही ? आणि अशा गोष्टी लपून का राहतात ? ह्यांच्याशीं बोलतांना चढणारी तिच्या चेहऱ्यावरील लाली— ( दामलेच्या चेहऱ्यावर हास्य चमकूं लागतें. )

**नाडकर्णी**— परवा ती तुम्हांला शोधीत होती कॉलेज–लायब्ररींत.

**देसाई**— अहो, पण तुम्ही जर कांही बोललां नाहीत तर ती तरी बिचारी काय करणार ?

**दामले**— ( दामले स्वतःशींच विचार करीत उभा रहातो. बाकीचे एकमेकांकडे पाहून हसतात. थोड्या वेळाने ) बरं, मग आता मी आपली रजा घेतों–

**प्रधान**— ( केळकरला ) पुरा बनला !

**देसाई**— अवश्य ! जा तुम्ही. असल्या कामांत कोणी कोणाला त्रास देऊं नये !

**नाडकर्णी**— नमस्कार.

**प्रधान**— तुम्हांला सुयश चिंतितों ! ( दामले जातो. )

( चौघेहि मित्र एक मिनिटभर मोठमोठ्याने हसतात. )

**केळकर**—(हशा ओसरल्यावर) बाकी अगदी पुराच बनला हं.

**देसाई**— ( सुवासिक रुमालाने तोंड पुशीत ) एवढ्यानंच काय झालं आहे ? त्याची अगदी पुरी फजिती उडवली पाहिजे.

**नाडकर्णी**— लीला कामतचं त्याच्यावर प्रेम ! मूर्ख आहे बेटा—

**प्रधान**— मूर्ख तर खराच ! हं देसाई, आपण तर फारच गारठलों बुवा ! कांही चहाबिहा देशील कीं नाही ?

**केळकर**— सिगरेटनं कांही थंडी जात नाही.

**देसाई**— मग चला की ! मी कुठं नाही म्हणतों आहे ? आज श्यामला बनवल्याचा आनंद व्यक्त करण्यासाठी दोनदोन पेले चहा ढोसूं या ! ( जातात. )

---

## प्रवेश दुसरा

( श्याम दामलेची खोली. खोलीला निळा रंग दिला असून त्यावर दोनचार कॅलेंडरें विराजमान झालेलीं दिसत आहेत. एका भिंतीशीं एक टेबल व खुर्ची ठेवली आहे. टेबलावर एक स्टँड असून त्यावर सात आठ बी. ए. च्या परीक्षेला नेमलेलीं पुस्तकें दिसत आहेत. टेबलावर एक रायटिंग पॅड आहे. खोलीच्या एका बाजूला एक पलंग आहे. समोरच्या भिंतीजवळ एक सुंदर आरशाचें टेबल आहे. हँगरवर तीन चार कोट व विजारी टांगल्या आहेत. दारापाशी तीन बुटांचे जोड

दिसत आहेत. दामले एका इझीचेअरवर आतुरतेने एक पत्र वाचीत बसला आहे.)

**दामले**—(पत्र वाचीत) माझा माझ्या डोळ्यांवरही विश्वास बसत नाही! इतकं माझं नशीब चांगलं असेल असं मला वाटलं नव्हतं! त्या दिवशीं देसाई म्हणाला तें कांही खोटं नव्हतं! पहिल्यानं मला वाटलं की थट्टा करतो आहे. पण नाही– त्यांचा ग्रूप मला वाटत असे तितका टवाळ दिसत नाही एकंदरींत– (पत्राकडे पहात) आहा– अक्षर तरी काय सुंदर आहे! जणू मोत्याचे दाणे! मुलींचीं अक्षरं मुलांपेक्षा चांगलीं म्हणतात ते उगीच नाही कांही! इंग्लिश तरी काय बेफाम लिहिते! 'I missed you last week.' खरोखरच तिला माझी आठवण होत असेल का? मला तर प्रत्येक क्षणीं तिची आठवण येते. प्रेमानं मनुष्याच्या आयुष्यांत काय क्रांति घडून येते! बाकी "परस्परांचं प्रेम असलं तर ठीक, नाही तर प्रेम म्हणजे मरण." हें तर खरंच! काय मी भित्रा! देसाई मात्र मोठा सूक्ष्मदृष्टीचा हं. मी उगीचच तिच्याशीं जास्त कमी बोलायला भीत होतों. अन् आता तिनं आपण होऊनच लिहिलं आहे म्हणून– नाही तर मी आपला असाच इथं संशयांत पडलों असतों कीं नाही! (एकदम उभा राहून) आहा! प्रेमाची खात्री झाल्याचा आनंद प्रेमी हृदयालाच माहीत. माझ्या नीरस आयुष्यांत एकदम गोडी उत्पन्न झाली. तिची भेट होण्यापूर्वी असं बोलूं तसं बोलूं म्हणून मी निश्चय करतों, पण– प्रत्यक्ष ती समोर येतांच माझं सर्व भाषण मी विसरून जातों. तीसुद्धा इतर मुलांशीं बोलतांना किती मोकळी असते. पण माझ्याशीं बोलतांना तिच्या तोंडावर किती लाली चढते! हीं सगळीं प्रेमाचीं लक्षणं नव्हेत का? उद्या चार वाजतां तिनं बंडवर बोलावलं आहे. (इतक्यांत दारावर टक् टक् आवाज ऐकूं येतो– श्याम त्रासिकतेने उठतो व दार

उघडावयास जातो. ) कोण ? ( किंचित् हसून ) ओहो देसाई ! या या, बसा ना. ( देसाई खिशांतील रुमाल काढून खुर्चीवर बसतो. त्याच्या तोंडावर मिस्किलपणाचें हास्य चमकत आहे. )

**देसाई**— ( एकदम ) मी मध्येच येऊन त्रास दिला का ?

**श्याम**— ( हातांतील पत्रावर नजर टाकीत ) छे छे ! देसाई, तुझ्याखेरीज दुसरा कोणी आला असतां तर मात्र मला चीड आली असती.

**देसाई**— ( आपण त्या गावचेंच नाही अशा आविर्भावाने ) तें कसं काय ? ( स्वस्थपणें खिशांतून सिगरेट काढतो व त्यांतील एक शिलगावतो. नंतर श्यामपुढे सिगरेट केस धरतो, पण आठवण होऊन एकदम मागे घेतो. ) अरेच्या, मी विसरलोंच. तुम्ही ओढीत नाही, नाही का ?

**श्याम**— नाही. ( श्याम आपल्या आनंदाचें कारण त्याला कसें सांगावें याचा विचार करतो. )

**देसाई**— ( हें ओळखून ) माझ्या येण्यानं तुम्हांला त्रास नाही झाला एकंदरींत, दामले ?

**श्याम**— ( हसून ) छे छे. तुम्हांला भेटावं अशी मला आताच इच्छा झाली होती.

**देसाई**— वा ! मग मी आल्यानं आयतंच काम झालं म्हणायचं ! काय म्हणतात बरं याला ? सहसंवेदना का कायसं नांव आहे ना या प्रकाराला !

**श्याम**— ( एकदम ) देसाई, तुमचं म्हणणं खरं ठरलं ! मला पत्र आलं आहे.

**देसाई**— ( त्याला एकदम हसूं येतें; पण तो तें तोंडावर रुमाल धरून मोठ्या कष्टाने आवरतो व कुतूहलाचा अभिनय करतो. ) खरंच ? ( एकदम उठून त्याच्या पाठीवर थाप मारून ) मनापासून अभिनंदन. ( त्याच्या हातां-

तील पत्राकडे पहिल्यांदाच लक्ष गेल्यासारखें दाखवून ) अस्सं ! मी म्हटलं नाही तुम्हांला. तिचं तुमच्यावर मन आहे, हें मी केंव्हाच ओळखलं होतं.

**श्याम**— मला वाटलं तुम्ही माझी थट्टाच करीत होता. आज पत्र आलं, तेंव्हा तुमच्या म्हणण्याची खात्री पटली.

**देसाई**— पहा. अन् तुम्ही उगीचच आपले तिच्याशीं बोलायलाहि भीत होतां ! तुम्ही लोक उगीचच लाजाळूपणानं नाश करून घेतां. आताच पहाना, लीला कामत आपली धीट होती म्हणून, नाही तर तुमच्या लाजाळूपणानं आज दोन प्रेमी हृदयांचा केवढा विरस झाला असता !

**श्याम**— त्याचं आता मला फार वाईट वाटत आहे. पण तुम्हीच सांगा देसाई, असं मत ओळखायचं तरी कसं ? समजा. तिच्या मनांत कांही नसलं आणि मी त्याचा भलताच अर्थ केला असता म्हणजे—

**देसाई**— ( हसू दाबीत ) पण असं कसं होईल. अन् निदान तुम्हांला तरी भिण्याचं मुळीच कारण नव्हतं.

**श्याम**— ( उत्सुकतेने ) तें कसं काय बुवा ?

**देसाई**— ( हसत ) अहो, मुलींचं प्रेम बसण्यासारखे आहांतच तुम्ही.

**श्याम**— ( अतिशय आनंदून ) उगीच थट्टा करतां झालं !

**देसाई**— ( गंभीरपणाचा आव आणून ) थट्टा नाही हो, तुमची विद्वत्ता, सभ्य वागणूक-सर्वच मुलींना आवडण्याजोगं. नाही तर आम्ही ! आमच्या सारख्यांना मुली नालायक समजतात बरं. ( मनांत ) ह्या पुस्तकी किड्यांना काय मुली माळ घालणार ? हं !

**श्याम**— ( हसत ) तुमच्या शब्दांबद्दल फार आभारी आहें मी ! ( पत्राकडे पहात ) हें पहा, तें पत्र, तिनं मला चाराला बोलावलं आहे !

**देसाई**— ( हसू मोठ्या कष्टाने आवरीत ) कुठं ?

**श्याम**— ( लाजत ) बंडवर.

**देसाई**— वा, अगदी योग्य जागा शोधून काढली आहे तिनं. लीला कामत मोठी रोमँटिक आहे हं. ( पत्राकडे नजर टाकतो. )

**श्याम**— ( पत्र त्याच्यापुढे धरून ) वाचा की, माझी हरकत नाही.

**देसाई**— ( पत्र घेऊन वाचण्याचें सोंग करीत ) काय सुंदर अक्षर आहे ! इंग्लिशहि छान लिहिते हं. ( श्यामच्या पाठीवर थाप मारून ) खरंच दामले, मोठे नशीबवान् आहां बुवा ! ( एकदम रिस्टवॉचकडे पाहून ) बारा वाजले. आता मला गेलं पाहिजे. ( खुर्चीवरून उठून ) दामले, अच्छा ! Cheerio, wish you best luck tomorrow !

**श्याम**— ( त्याचा हात ओढून ) थांबा देसाई ! चहा घेऊन जा.

**देसाई**— छे छे. वेळ नाही मुळीच ! आता एकदम लाड्डूच घ्या झालं ! अच्छा ! नमस्कार.

**श्याम**— नमस्कार.

**देसाई**— ( खोली बाहेर आल्यावर ) पुरा बनला. उद्या फार मजा होणार हं !

---

## प्रवेश तिसरा

( बंडगार्डन— दुपारीं चाराचा सुमार. अजून ऊन असल्यामुळे फारशी गर्दी जमली नाही. पावसाळ्याचे दिवस असले तरी आज ऊन पडलें आहे; आणि त्यामुळे पावसाच्या किरकिरीने कंटाळलेल्या लोकांना समाधान वाटत असल्या-सारखें दिसत आहे. निदान धरणाच्या बाजूला असलेल्या भिंतीला टेकून उभ्या

असलेल्या चार तरुणांच्या हास्यविनोदावरून तरी असें स्पष्ट दिसत आहे.)

**नाडकर्णी**— बाकी देसाई, श्यामची आज फारच जिरणार बुवा !

**प्रधान**— पुन्हा म्हणून बापडीच्या वाटेला जायचा नाही.

**देसाई**— काल बनली होती स्वारी. प्रत्येक क्षणीं मला हसूं लोटत होतं. तुम्ही असतां, तर मला तें आवरतां आलं नसतं.

**केळकर**— पण देसाई, लीला कामत येईल का ? नाहीतर सगळं ओंफस. देसाई, नाहीतर आपणच तिचें काम करूं ! त्याला फायलावर घेऊं, नी काय ! पण बहुतेक येईलच ती.

**प्रधान**— नाही तर तें पत्र पाहून स्वस्थ बसेल घरीं ! पुन्हा त्याच्या-शीं बोलायची नाही एवढंच.

**नाडकर्णी**— पण मला माहीत आहेना तिचा स्वभाव ? इतर मुलीं-सारखी ती लाजरी नाही ! मोठी विनोदी आहे ती. त्याची अगदी भंबेरी उडवेल. दामलेची फजिती उडविण्याची संधि ती घालवायची नाही.

**प्रधान**— वा ! ही दामलेचीच स्वारी येत आहे ! (रिस्टवॉचकडे पहात) बरोबर चार वाजले. वेडापीर चारला हजर.

**केळकर**— मला त्याची कीवच येऊं लागली आहे.

**देसाई**— वा ! स्वारी फ्लॅनेलची विजार आणि ब्लेझरचा कोट घालून आली आहे की !

**प्रधान**— पण आता लीला कामत हजेरी घेईल तेव्हा कळेल खरी गंमत. चला, आपण जरा त्याची मजा करूं या !

**देसाई**— अऽहं ! त्याला उगीच संशय यायचा भलताच. आपण आपलं स्वरूप मागूनच प्रगट करूं.

**प्रधान**— हिरण्यकश्यपूसारखं का ?

**देसाई**— वा पुराणिक !

**केळकर**— वा ! पीरसाहेब तर पार त्या झुडपांत जाऊन बसले ! अन् ओहो, लीला कामत तर आली !

**सगळे**— (एकदम) लीला कामत आली ?

(लीला कामत टांग्यांतून उतरते. ती तांबड्या धारीचें शुभ्र पातळ नेसली असून त्याला शोभणारा शुभ्र ब्लाऊझ तिने घातला आहे. तिचा पोषाख नेहमी-चाच, पण आज तिने तो काळजीपूर्वक केलेला दिसत आहे. चेहऱ्यावरील मंद हास्याने ती आज अधिकच आकर्षक दिसत आहे.)

**केळकर**— तिचं लक्ष आपल्याकडं जातां कामा नये हं. आपल्याला manners नाहीत असं समजायची एखादी ! नाडकर्णी तुमची ओळख असली तरी आता तिचं प्रदर्शन नका करूं बुवा !

**नाडकर्णी**— (सिगरेट पेटवीत) मागून मात्र तुमची ओळख करून दिली म्हणजे झालं नाहीं का ?

**प्रधान**— तिनं त्याला कुंजांत जातांना पाहिलं वाटतं ! परस्पर तिकडंच गेली तीही.

**नाडकर्णी**— पाहिलं असेल तर ! स्वारी समोरच उभी होती ! ती आली असं पाहतांच गेली असेल कुंजांत.

**देसाई**— चला, आता पीरसाहेबांची फजिती ऐकायला कुंजामागं या.

(सगळे कुंजामागे जाऊन उभे रहातात व कान देऊन आंतील संवाद ऐकतात.)

**नाडकर्णी**— लीला कामत आता चांगली उडवील नी काय साहेबांची !

**देसाई**— प्रधान, कॅमेरा आणला आहे का तुम्ही ? छान स्नॅप घेतां आला असता श्यामरावांच्या मुखारविंदाचा !

**केळकर**— हो, वीकलींत consolation prize तरी मिळालं असतं.

**कुलकर्णी**— गप्प बसा हं आता ! ( सर्व ऐकूं लागतात. )

**श्याम**— ( कुंजांत ) तुमची भेट होऊन आठ दिवस होऊन गेले.

**लीला कामत**— ( लाजत ) मागल्या आठवड्यांत तुम्ही कुठं होता? मी रोज तुम्ही भेटाल, म्हणून कॉलेज–रीडींगरूममध्ये जायची–नी रोज माझी निराशा व्हायची ! मग तर मला वाटायला लागलं की, तुम्ही कॉलेज सोडून गेलात वाटतं.

**दामले**— ( तिच्या चेहऱ्यावर दृष्टि लावून ) छे छे ! तुम्ही इथं आहांत तोंवर मी हें कॉलेज सोडीन का ?

**प्रधान**— ( कुंजाबाहेर घाबरून ) हें काय हें देसाई ? ही तर चांगली प्रेमाची भाषा बोलूं लागली आहे !

**नाडकर्णी**— ( त्रासिक स्वरांत ) मध्ये बोलूं नका हो. पहा, मधलीं तीन वाक्यं ऐकूंच आलीं नाहीत.

**लीला कामत**— ( कुंजांत ) मला तुमच्या मनाची काय कल्पना येणार ? अन् तुम्ही कधी माझ्याशीं आपण होऊन बोललां आहांत?

**दामले**— मला त्याचं फार वाईट वाटतं. मला फार भीति वाटे. आता ह्याच्यापुढे मात्र—

**लीला कामत**— ( प्रेमदृष्टीने त्याच्याकडे पहात ) बरं, मी जातें. आता आईला तिच्याबरोबर एका ठिकाणीं जायचं कबूल केलं आहे. तिला कांहीतरी महत्त्वाचं काम आहे, असं सांगून इकडं आलें आहें. ( ती उठते. )

**दामले**— ( उठून ) बरं ! मग आता कधी भेटणार ? उद्या कॉलेजांत—

**लीला कामत**— हो. उद्या मला तिसरा तास नाही. तुम्हांला आहे ?

**दामले**— अं ! तास असेना– देईन बुट्टी. ( ती हसते. तो हसतो. )

**प्रधान—** ( कुंजाबाहेर ) हें काय देसाई, भलतंच झालं.

**नाडकर्णी—** थांबा हो. अजून संभाषण संपलं नाही. ती मोठी विनोदी आहे—

**केळकर—** नाही तर आपली थट्टा चांगली त्यांच्या पचनींच पडली म्हणायची. ( देसाई कांही बोलत नाही. )

( इतक्यांत कुंजाचा दरवाजा उघडून लीला कामत प्रवेश करते. तिच्या पाठोपाठ श्याम बाहेर येतो. ती आल्या बाजूने न जातां मागल्या बाजूला बघते. तोंच तिला कान देऊन ऐकत असलेले चतुर्वर्ग दिसतात. तिच्या कपाळावर आठ्या पडतात. )

**लीला कामत—** ( इतक्यांत तिला नाडकर्णी दिसतो. त्याला पाहून रागाने ) नाडकर्णी, तुम्ही यांपैकी असाल, असं वाटलं नव्हतं मला !

( नाडकर्णी कांही बोलणार, तोंच ती निघून जाते. दामले हसत तिच्याबरोबर जातो. देसाई, नाडकर्णी, केळकर व प्रधान नुसते एकमेकांकडे पाहतात. )

---

दसरा १९३३

# प्रवेश पहिला

( सायंकाळीं पांचाचा सुमार. रमाबाई माजघरांत तांदूळ निवडीत बसल्या आहेत. त्यांनी निवडलेल्या तांदुळाच्या मानाने पाटावरील ढीग कांहीच नाही. आसपास सूप, तांदुळाचे डबे, चाळणी वगैरे अस्ताव्यस्त पडलीं आहेत. त्यावरून रमाबाईंचा तांदूळ निवडण्याचा कारखाना केवढ्या जंगी प्रमाणांत चालतो, त्याची कल्पना येईल. शिवाय तो चालविणाऱ्या त्या एकट्याच दिसत आहेत; कारण धाकटी विमल उगीच इकडून तिकडे व तिकडून इकडे अशा फेऱ्या मारीत आहे. मोठी सुशिला सारखी गॅलरींतून कोणाचीतरी मार्गप्रतीक्षा करीत हिंडत आहे. )

**रमाबाई—** ( सुशिलेला गॅलरींतून धावत धावत जिन्याच्या दाराशीं जातांना पाहून ) काय ग सुशे, झालं काय इतकं धावायला ?

**विमला—** ( गॅलरींत धावत जाऊन खाली वाकून पाहिल्यावरसुद्धा कोणीच ओळखीचें न दिसल्याने ) विचित्रच आहे बाई ही ताई ! खाली तर कुणीच आलेलं दिसत नाही, नी—

**रमाबाई—** अग ती तर मघाशीच गेली धावत खाली. कुणी आलं असलं, तर रस्त्यावर कसं दिसेल तुला ? जिनासुद्धा लागलं असेल चढायला—

**विमला—** ( धावत जिन्यांत जाऊन दाराशींच हातांतील पत्र अधीरतेने

वाचीत उभ्या असलेल्या सुशिलेला पाहून ) अगबाई ! आई, ताई तर इथं पत्र वाचीत उभी आहे ! कुणाचं ग पत्र ! बघूं मला–

**सुशीला**— ( विमलेवर खेकसून ) कुणाचंही असेल ! तुला ग काय पंचाईत ? चोंबडी नाही तर–

**विमला**— ( रागाने ) बरं जा माझं खेटर अडलं आहे पहायला. ( माजघरांत जाते. )

**रमा०**— कुणाचं ग पत्र आहे तें विमल ?

**विमला**— ( फुरगटून ) कुणाचं का असेना. आपल्याला काय चोंबडे-पणा करण्याचं कारण ?

**सुशीला**— ( एका हातांत फोडलेलें पाकीट व दुसऱ्या हातांत लांबलचक पत्र घेऊन धावत येऊन ) आई, आई—

**विमला**— का ? आता कशाला आलीस सांगायला ?

**सुशीला**— ( विमलेकडे दुर्लक्ष्य करून ) आई ग, त्यांनी किनई आपल्या घरीं मोटार घेतली आहे मोटार !

**रमा०**— ( आनंदून ) खरंच का ?

**सुशीला**— अग, खरं का म्हणून काय विचारतेस ? हें बघ आत्ताच त्यांचं पत्र आलं, त्यांत लिहलंय् त्यांनी !

**रमा०**— वा ! मोटार घेतली ना जावईबुवांनी ! माझी सुशी आहेच तशी भाग्याची.

**विमल**— ( सुशिलेजवळ जाऊन आतुरतेने ) अग, ताई ! खरंच का मोटार घेतली भावोजींनी ?

**सुशीला**— अग, खोटं का सांगतें आहें मग मी ?

**विमला**— ( आनंदाने उड्या मारीत ) वा ! आता आम्ही मोटारींतून

हिंडणार सगळीकडे. ए ताई, मला नेशील ना ग एकदा बंडगार्डनवर ?

**सुशीला**— हो–हो. उद्या ते स्वतःच येणार आहेत मोटार घेऊन–

**रमा०**— अगबाई ! हो का ! आता त्या शांताबाईची नी लक्षुमबाईची चांगली जिरेल ! त्या शांताबाईना वाटत होतं की, स्थळ चांगलं काय तें आपल्या कमीलाच मिळालं आहे ! पण घ्या म्हणावं आता ! तुमच्या कमीच्या घरीं टांगातरी आहे का ?

**सुशीला**— अग, टांगा तरी कुठला ? पायींच तर फिरते इकडून तिकडे ! अन् लक्षुमबाईच्या हिरीचा नवरा तर परवा आमच्याकडेच दहा रुपये मागायला आला होता. त्याला जायचं होतं बेळगावला; पण जवळ नव्हती एक दिडकीसुद्धा ! मी तर त्या हिरीचं नाक ठेचावं म्हणून ह्यांना देऊं नका म्हणून सांगत होतें; पण यांचा स्वभाव पडला उदार ! दिले आपले दहा रुपये काढून पटकन् !

**रमा०**— ( जावयाच्या गुणवर्णनापुढे लक्ष्मीबाईची निंदा करण्याचें विसरून ) तर तर ! तसे आमचे जावईबुवा भारीच उदार आहेत हो ! मोठ्यांचं किनई सारंच मोठं असतं.

**सुशीला**— ( आरशापुढे उभे केस सारखे करीत. ) अग उदार म्हणजे किती उदार पण ! कोणी विद्यार्थी आला की, दे त्याला फीचे पैसे. कोणी भिक्षुक आला नी लागला काशीयात्रेला जायच्या गप्पा मारायला की द्रवलं यांचं मन नी दिले काढून पैसे.

**रमा०**— अग, देवाच्या दयेनं त्यांना कांही कमी नाही. हे भिकारडे काय दानधर्म करणार नाहीतरी !

**सुशीला**— ( केसाचा अंबाडा बांधीत ) आणि श्रीमंत झाले किनई, तरी तशी बुद्धि असावी लागते हो.

**रमा०**— तें तर खरंच ग बाई !

**विमला**— ( गॅलरींतून धावत माजघरांत येऊन ) अगबाई ! ताई, तूं चाललीस तरी कुठं आता ?

**रमा०**— विमल, तुला धावल्याशिवाय चालतांच येत नाही वाटतं ? घर तर अगदी हादरायलाच लागतं !

**सुशीला**— ( आरशांत केसांचें वळण साधलें आहे की नाही, तें पहात ) आई, तिला की नाही आज फार आनंद झाला आहे, म्हणून नाचते आहे ती ! अन् घर तरी कसलं आहे हें ! जरा जोरानं चालायला लागलं की, हादरायलाच लागतं मेलं !

**रमा०**— अग, आपल्या सत्तेचं का आहे हें घर ?

**विमला**— ( पुन्हा ओरडून ) ए ताई ! सांग ना पण कुठं चालली आहेस ती ?

**सुशीला**— ( फणीचे केस काढीत ) मी चाललें आहें त्या प्रियंवदेकडे.

**विमला**— मग मी पण येतें.

**सुशीला**— माझ्या मैत्रिणीकडं तुझं ग काय काम आहे ?

**रमा०**— ने बाई तिला ! तूं सारा दिवस भटकतेस, अन् मग तिला एकटीला घरांत राहण्याचा येतो कंटाळा ! नेईनास जराशी.

**सुशीला**— बऽऽरं – चल बाई. पण अशा अवतारांत मात्र नको येऊंस माझ्याबरोबर !

**रमा०**— मग जरा तिचे केस विंचर की.

**सुशीला**— तूंच घाल बाई तिची वेणी. मला अजून तोंडबिंड धुवायचं आहे.

**रमा०**— ये ग विमल, फणी घेऊन इकडं !

( सुशीला मोरींत टॉवेल घेऊन जाते व विमला फणी घेऊन रमाबाईपुढे बसते. )

## प्रवेश दुसरा

( प्रियंवदेचें घर. प्रियंवदा पाय टेबलावर ठेवून खुर्चीवर वाचीत बसली आहे. खोलींतील सामान सर्वत्र अस्ताव्यस्त पडलें आहे. टेबलावर कांही मराठी, इंग्रजी कादंबऱ्या, मनोरंजनाचा एक जुना अंक, दौत, टाक वगैरे अस्ताव्यस्त रीतीने पडलीं आहेत. सतरंजीवर एक ट्रंक उघडी पडली असून तिच्यांतील कांही जिनसा सतरंजीवर पसरल्या आहेत. भिंतीला टेकून उभ्या असलेल्या कपाटाच्या खणाच्या बाहेर कांही कपडे डोकावीत आहेत. )

**प्रियंवदा**— ( दारावरील टिचक्या ऐकून खडबडून नीट बसत ) कोण आहे ?

**सुशीला**— ( दाराच्या आडून ) आम्हीच आहोंत म्हटलं प्रियंवदाबाई !

**प्रियंवदा**— ( उठून दार उघडते. दार उघडतांच सुशीला, विमला दिसतात. त्यांना पाहून लगबगीने ) अगबाई, सुशीला वाटतं ? यावं बाईसाहेब. आज इतक्या दिवसांनी कुठं चुकलीस तूं ?

**सुशीला**— ( दारांतून आंत येत ) इतक्या दिवसांनी म्हणजे ग काय प्रियंवदे ? मला येऊन फार दिवस नाही झाले कांही !

**प्रियंवदा**— ( खोलींतील अव्यवस्था, स्वतःचा अवतार यांनी लाजून, विशेषतः सुशिलेचा भपकेबाज पोषाख व आपला बावळट वेष यांत केवढें महदंतर दिसत असेल, असें वाटून ) हो—का ? आंत ये—आज किनी आमच्या घरांत जो कांही पसारा झाला आहे, तो विचारूं नकोस ! ( हसून ) आज सकाळ-पासून मी सारं घर आवरायला काढलं आहे !

**सुशीला**— ( इकडेतिकडे बघून ) हो, तें तर दिसतंच आहे !

**प्रियंवदा**— बस ना अशी इथं. ( सतंरजी नीट करते. त्यावर सुशीला व विमला बसतात. )

**सुशीला**— ( टेबलावरील वस्तु नीटनेटक्या करण्याचा प्रयत्न करणाऱ्या प्रियंवदेस ) आज रामराव कुठं बाहेर गेले आहेत वाटतं ?

**प्रियंवदा**— ( टेबलावरील धुरळा एका फाटक्या पोलक्याने झाडीत ) होय, नाशकाला कायसं काम होतं, म्हणून परवाच गेले ते. उद्या संध्याकाळीं येतील.

**सुशीला**— ( एकदम ) अगबाई ! नाशकाहून उद्या संध्याकाळीं का येणार आहेत ते ? मग—

**प्रियंवदा**— ( धुरळा झाडण्याचें तसेंच टाकून सुशिलेकडे पहात ) मग – काय ?

**सुशीला**— ( विमलेकडे पाहून ) नाही म्हटलं उद्या संध्याकाळीं नाशकाहून यायचे आहेत ते, हें आधींच समजलं असतं तर किती उत्तम झालं असतं !

**प्रियंवदा**— ( बुचकळयांत पडून ) कां बाई ?

**सुशीला**— नाही म्हटलं आमच्या इथं किनी नाशकाला मोटार घेतली आहे. उद्याच ते तिकडून स्वत: मोटारनं येणार आहेत. तेव्हा रामरावसुद्धा नाशकाहून यायचे आहेत, हें आधी ठाऊक असतं तर—

**प्रियंवदा**— ( विस्मयाने ) काय ? शामरावांनी मोटार घेतली ?

**सुशीला**— ( प्रियंवदेला आपला मत्सर वाटत आहे, अशा समजुतीने ) हो. नुकतीच घेतली आहे. अन् आता मी तुला मुद्दाम उद्या संध्याकाळीं बंडगार्डनवर बोलवायलाच आलें आहें.

**प्रियंवदा**— खरंच का ? ( वरकरणी हसून ) आता काय बाई सुशे ! तूं मोटारींतून हिंडणार ! आमच्यासारख्यां गरीब मैत्रिणींची आठवण तरी ठेवशील का मग ?

**सुशीला—** इश्श ! न ठेवायला ग काय झालं ?

**प्रियंवदा—** खरंच, पण सुशे ! फोर्ड घेतली, शेवरोलेट् घेतली कीं रोल्स रॉईस ?

**सुशीला—** ( मानेला मुरड घालून ) तें नाही बाई त्यांनी पत्रांत लिहिलं कांही ! पण निदान शेवरोलेट् तरी असेलच. हो, भिकारड्या फोर्डमधून कोण बसलंय् बाई हिंडायला !

**प्रियं०—** ( हसून ) हो बाई ! तें तर खरंच !

**सुशीला—** ( उठून ) बरं, मी जातें आता, प्रियंवदे.

**प्रियं०—** ( आश्चर्यानें ) कां ग ! इतक्यांत ?

**सुशीला—** नाही ग, आम्हांला आणखी दुसरीकडं जायचं आहे.

**प्रियं०—** चल, खोटं सांगतेस. काय ग विमल, खरंच का जायचं आहे तुम्हांला कुठं ?

**विमल—** ( ताईच्या डोळ्यांकडे पहात ) हो !

**सुशीला—** बघ. तीसुद्धा सांगते आहे तेंच. आता तर झाली खात्री ! बरं पण उद्या मात्र तूं पांच वाजतां जरूर ये हं !

**प्रियं०—** अग, पण उद्या नाशकाहून येणार आहेत ना ते !

**सुशीला—** ( जरासा विचार करून ) मग त्यांना पण घेऊन ये ना बरोबर !

**प्रियं०—** बघेन बाई. ते आले तर येईन.

**सुशीला—** बरं. आम्ही जातों हं !

**प्रियं०—** ( शिष्टाचारास अनुसरून ) अग, थोडा चहातरी घेऊन जा. इतक्या दिवसांनी आलीस –

**सुशीला—** आता वेळ नाही ग. पुन्हा आलें म्हणजे जरूर घेईन.

**प्रियं०**— नाहीच घेत तूं ? अगदी घोड्यावरूनच आलीस. बरं थांब. कुंकू तरी लावतें.

( प्रियंवदा कुंकू लावते. विमला, सुशीला जातात. )

---

## प्रवेश तिसरा

( जानकीबाईचें घर. जानकीबाई ओसरीवरील उखळांत तिखट कुटत आहेत. त्यांची कन्या सुमति पण त्यांना हातभार लावीत आहे. जानकीबाई एक पाय पसरून उखळापाशीं बसल्या असून, त्यांचे हातपाय तांबडे झाले आहेत. अंगांतून घामाच्या धारा निघत असून नाकांत तिखट गेल्यामुळे उभयतां मायालेकी खोकत आहेत.

**जानकीबाई**— ( उखळाबाहेर पडलेलें तिखट आंत सारीत ) हुश्श ! काय ग बाई हें तिखट— कुटतां कुटतां जीव जायला लागला नुसता.

**सुमति**— ( आईच्या बोलण्याचा फायदा घेऊन ) म्हणूनच म्हणतें आई, तिखट किनी घरीं कुटूंच नये. तसंच विकत घ्यावं बाजारचं. आता आम्ही नाही का मुंबईला—

**जानकी०**— ( घाम पुशीत ) अग, पण जरा कुटलं तर जीव का जातो आहे ! अलीकडं की नाही प्रत्येक गोष्ट बाजारांत मिळूं लागल्या-पासून बायका भारी आळशी होऊं लागल्या आहेत.

**सुमति**— ( आईच्या लेक्चरच्या भीतीने सावरून घेत ) तसं नव्हे गं आई.

( इतक्यांत रमाबाई घरांत प्रवेश करतात. )

**रमा०**— काय चाललं आहे जानकीबाई ?

**जानकी०**— हें तिखट कुटतें आहें झालं. केव्हाची कुटीन कुटीन म्हणतें आहें, तें आज झालं. बसा तरी तिथं. सुमे, पाट देग त्यांना आणून.

**रमा०**— कांही नको. बसतें इथंच. ( खाली बसते. )

**जानकी०**— आज इकडं कुठं आलांत रमाबाई !

**रमा०**— ( डोळे चोळीत ) नाही हो सहजच. आमची सुशी म्हणाली परवा की तुमची सुमी आली आहे म्हणून.

**जानकी०**— म्हणजे ! सुशी कधी आली ?

**रमा०**— तिला येऊन चांगले आठ दिवस होतील उद्या.

**सुमति**— मग इकडं नाही ती कुठं आली ?

**रमा०**— अग, ती तर केव्हाची जाईन जाईन म्हणून घोकते आहे; पण यायलाच होत नाही तिला. चार दिवस माहेरीं आलं की अस्सं होतं.

**जानकी०**— ( आपल्या मुलीचें कौतुक करण्यास अधीर होऊन ) हो बाई ! आमच्या सुमीचीच गोष्ट घ्या ना. परवा मुंबईहून आली नाही, तोंच बोलावण्यावर बोलावणीं.

**रमा०**— आज की नाही सुशीच येणार होती. तिला नाही झाला वेळ यायला. तिच्या नवऱ्यानं म्हणे मोटार घेतली आहे– ( आपल्या वाक्याचा त्या दोघींवर अनुकूल परिणाम झालेला पाहून ) उद्या जावईबुवा स्वत:च येणार आहेत मोटार घेऊन. बंडगार्डनवर जायच्या आहेत फिरायला. जानकीबाई, तुम्ही सारीं या की उद्या !

**जानकी०**— ( सुशिलेच्या श्रीमंतीने दचकून हातांतील काम क्षणभर तसेंच टाकून–नंतर भानावर येऊन ) इतका का श्रीमंत आहे तुमच्या सुशीचा नवरा !

**रमा०**— ही गोष्ट सांगायला का पाहिजे ? आजकाल मोटार ठेवायची

म्हणजे तीनचार हजार रुपये तर किंमत पडते म्हणतात! अन् झालं तर शंभर रुपये महिन्याचा खर्च वेगळाच !

**जानकी०**— ( गिरगावांतील एका घाणेरड्या चाळींत राहणाऱ्या सुमीची मनांत कीव करीत ) असेल बाई, आम्हाला काय माहीत !

**रमा०**— ( सुमीच्या दुःखावर डागण्या देण्याच्या हेतूने ) का ! तुमच्या सुमीच्या इथं असेल की मोटार ?

**जानकी०**— ( एक दुःखाचा उसासा टाकून ) नाही बाई !

**रमा०**— ( आपल्या कन्येची स्तुति करण्यास आतुर होऊन ) आमचे जावईबुवा म्हणजे रत्न आहेत रत्न ! दिसण्यांत देखणे, स्वभावानं दिलदार, श्रीमंत; मोटारसुद्धा उंचीच घेतली असेल त्यांनी ! आता काय नवरा राजा नी नवरी राणी– मोटारमधून फिरायचं—

**जानकी०**— अहो पण नुसती श्रीमंती असून तरी काय हो.

**रमा०**— तें तर खरंच. पण आमचे जावईबुवा स्वभावानंसुद्धा मोठे गोड आहेत हो. सुशिलेला कशी अगदी फुलासारखी वागवतात.

**जानकी०**— तसं सुख म्हटलं तर सगळ्यांपेक्षा आमच्या सुमीलाच जास्त आहे.

**रमा०**— अन् माझ्या सुशीला तरी काय कमी का आहे? बरं, जातें बाई मी आता. फार उशीर झाला. उभ्या उभ्या बसायला म्हणून आलें, पण एकदा बसलें ती बसलेंच ! बरं जातें हं. ( जाते. )

**जानकी०**— ( द्वेषाग्नि भडकून ) बाई – बाई – बाई आपल्या पोरीचं कौतिकच करायला आली होती हो. त्या सुशीला खरंच का इतकं चांगलं स्थळ मिळालं आहे. इतकी श्रीमंती नव्हती ऐकली तिची.

**सुमति**— ( डोळे मोडून ) कोणं जाणे बाई. खरं कीं खोटं–

# प्रवेश ४ था

( सहा वाजण्याचा सुमार. रमाबाईचा छोटा दिवाणखाना निमंत्रित पाहुण्यांनी भरून गेला नसला, तरी जाणार असावा असें दिसत आहे; कारण साऱ्या दिवाणखान्यांत एक लांबच लांब सतरंजी पसरली असून, सर्व सामानही व्यवस्थित लावून ठेवलें आहे. प्रियंवदेचे पतिराज अद्यापि नाशकाहून न परतल्याने वाट पाहून थकल्यावर ती आदल्या दिवशीचें उट्टें भरून काढण्याकरिताच कीं काय एक उंची सोनसळी रास्ता व रेशमी ब्लाऊझ घालून तयार झाली आहे. विमला आपल्या नव्या साडीच्याच झोकांत आहे. सुंदर केशरचना करून, आपल्या मोटारींतून सर्व फिरायला येणार, असें दाखविण्यासाठीच कीं काय सुशिलेने पोषाखांत सर्वांवर ताण केली आहे ! )

**सुशीला**— ( गॅलरींतून आंत सचिंत मुद्रेने येत ) अगबाई, सहा वाजायला आले आणि अजून कसे नाही येत ते. मला तर त्यांनी लिहिलं होतं की, चारालाच येतो म्हणून.

**रमा०**— अग, येतील. मोटार कुठं बिघडली असेल कदाचित् ! ( इतक्यांत दरवाजा उघडून जानकीबाई प्रवेश करतात. त्यांनी मोटारमध्ये बसण्यास योग्य अशी आपली पेटंट पोफळी परिधान केली असून, तिला योग्य असे नथ, बुगड्या, सरी वगैरे अलंकारही धारण केले आहेत. त्यांच्या मागोमाग नवीन लुगडें नेसलेली सुमी, जानकीबाईंची सकाळींच माहेरून आलेली सून, तिचा भाऊ, व तिचीं तीन मुलें येतात. )

**सुशीला**— ( इतका सर्व घोळका पाहून आईच्या कानांत कुजबुजते. ) ह्या कशाला आजच आल्या ?

**रमा०**—( हळूच ) चूप ग ! मीच त्यांना बोलावलं काल.

**सुशीला**— ( त्रासिक स्वरांत ) छान ! आता इतक्या सगळ्यांना काय

बोडक्यावर बसवायचंय् आपल्या !

**रमा०—** तू कशाला त्या प्रियंवदेला बोलावलंस मग ?

**सुशीला—** मग ? ती एकटी आहे. अन् ती माझी मैत्रिण आहे; पण यांचा काय संबंध !

**रमा०—** हं– कुजबुजूं नकोस अशी. त्यांना उगीच संशय येईल नुसता.

**सुशीला—** ( मनाशींच कांहीतरी पुटपुटत गॅलरींत जातां जातां ) अजून तर मोटारचा पत्ताही नाही अन् हीं उपटसुंभीं माणसं मात्र हजर !

**जानकी०—** ( सुशिलेच्या जरीच्या पातळाकडे पहात ) केवढ्याचं हो हें लुगडं ?

**रमा०—** ( तोऱ्याने ) तें होय ? केवढ्याचं बरं ? नाही बाई आठवत. सुशे, केवढ्याचं ग हें लुगडं ?

**सुशीला—** ( मनाशींच पुटपुटत ) नसत्या चवकशा भारी बाई यांना. ( कपाळाला आठ्या घालून उघड ) साठ रुपयांचं आहे.

**जानकी०—** ( मान डोलवून ) लुगडंही छानच आहे. बघूं ग पोत-बीत कसा आहे तो ?

**सुशीला—** ( रागीट स्वरांत ) काय पोत पाह्यचा आहे ! तुमच्या लुगड्यासारखाच आहे. ( गालांतल्या गालांत हसणाऱ्या प्रियंवदेकडे हसत पाहून चेष्टेच्या स्वरांत ) तुमचं लुगडंसुद्धा भारीच तर आहे !

**रमा०—** आता नवीन फॅशन आहे हो तशी. ( इतक्यांत मोटारच्या शिंगाचा आवाज ऐकूं येतो. विमला व सुशीला धावत जातात. त्यांच्यामागे सुमी व तिचे भाचेही धावत जातात. )

**विमल—** ( गॅलरींतून धावत येऊन ) आई ग, शामराव आले, पण ती

मोटार किनी त्या गजाभाऊंची लॉरी आहे ना, तशी आहे ग ! अय्या ! अगदीच जुनाट– अन् त्यांत कितीतरी माणसं कोंबलीं आहेत ग आई !

**रमा०**— अगबाई, खरंच का ? ( गॅलरींत जाऊं लागते. इतक्यांत हिरमुसलेलें तोंड करून सुशीला आंत येते व आईच्या कानांत कांहीतरी कुजबुजते. )

**सुशीला**— ( जिन्यावरील पावलांचा आवाज ऐकून ) अगबाई, आले वाटतं ते !

( डोक्यावर खादीची टोपी, अंगांत मळकट कपडे, अशा वेषांत शामराव घरांत येतात. त्यांना पाहतांच जानकीबाई सुमीच्या कानांत कुजबुजतात व हसतात. )

**सुशीला**— ( पतीजवळ जाऊन ) हें काय ?

**शामराव**— ( आंतल्या खोलींतील बायकांचा घोळका पाहून ) आज काय हळदीकुंकू आहे वाटतं ?

**सुशीला**— अहो, पण हळू बोला जरा – पण हें काय – मोटार कुठं आहे ?

**शामराव**— ( टोपी काढून घाम पुशीत ) मोटार तर खालीच उभी आहे; पण आधी पांच मिनिटांत चहा कर. उतारूंना बुधवारांत पोचवून येतों मग !

**सुशीला**— ( खेटर मारल्यासारखं तोंड करून ) इश्श ! अगदी माझी फजिती केलीत की ! इकडं मला वाटलं की, तुम्ही फिरायला मोटार आणलीत, अन् म्हणूनच मी ह्या सर्वांना बंडगार्डनवर नेण्यासाठी बोलावलं होतं !

**शामराव**— वारे वा ! हें सांगितलं कोणी तुला ? चैनीसाठी मी मोटार घेणार कसा, हें कळायला हवं होतं तुला !

**सुशीला**— ( रडत ) पण, मी काय करूं आता ?

**शामराव**— मी काय सांगू ?

**सुशीला**— त्यांना घेऊन चला सगळ्यांना फिरायला—

**शामराव**— छे–छे–छे ! मला लागलीच कॉलेजांतील कांही मुलं ट्रिपूला जायचीं आहेत, त्यांना पोचवायला जायचं आहे. ( खिशांतून घड्याळ काढून ) अरे बापरे. सहा वाजून गेले. ते विद्यार्थी तिकडं वाट पहात असतील अन् ते खालचे उतारूही ओरडतील. झटकन् चहा आण पाहूं.

**सुशीला**— हो. आता येईलच चहा; पण तुम्ही आधी मला कां नाही कळवलं तसं ? म्हणजे एवढी फजिती नको होती व्हायला !

**शामराव**— मला काय ठाऊक तूं इतकी मूर्ख असशील म्हणून. चैनीसाठी मोटार ध्यायला मी काय एखादा लक्ष्मीपुत्र आहें ? ( विमल चहा घेऊन येते. तो शामराव भरकन् घेतात. )

**शामराव**— ( चहा पीत पीत आंत पहात ) हें कोण, प्रियंवदाबाई का ? ( सुशीला त्यांना दाबते, ते 'हो' म्हणतात. प्रियंवदा ' काय ' म्हणून खोलीच्या दाराशीं येते. ती फुटूं पाहणारें अनिवार्य हसूं दाबीत आहे, असें तिच्या चेहऱ्या-वरून कोणालाही समजलें असतें.) अहो, तुमचे रामरावही आलेत ना मोटारमधून.

**प्रियंवदा**— ( फुटूं पाहणारें हसें मोठ्या कष्टाने दाबीत ) हो का ? तर मग मी जातेंच. ( पळतच जाते. )

**सुशीला**— ( जिन्यांतून प्रियंवदेचा हास्यध्वनि ऐकून दुःखाने ) कोण ही फजिती !

**जानकी०**— ( बाहेर येऊन उपहासाने हसून ) जातों म्हटलं— सुशीला-बाई ! खूप पाह्यली हो बंडगार्डन ! ( सुशीला कांही न बोलतां खाली मान घालून बसते. तिच्याकडे उपहासाने पहात जातां जातां ) माले, केवढ्यानं हसावं

उगीच. सुशीताईची हीच बंडगार्डन बरं ! पाह्यलीस ना इथली शोभा ! मग झालं तर ! एक मोटारींतून नाही जायला मिळालं मात्र– अग, श्रीमंताची मोटार ती ! त्यांचे कितीतरी मित्र सगळे खाली बसले आहेत. पाह्यलंस ना ?

**सुमति**— ( हास्याची उकळी दाबीत ) येते हं सुशे ! ( जातात. )

( सुशीला झालेला अपमान सहन न होऊन हुंदके देऊन रडूं लागते. एक उतारू येतो. )

**उतारू**— अहो, तुमची पांच मिनिटं सरणार तरी कधी ?

**शामराव**— ( डोक्यावर टोपी ठेवून, रडणाऱ्या सुशीकडे दुःखाने पहात ) हं ! चला, निघालोंच हा ! ( उतारू जातो. ) सुशे, जातों मी आता ! येईन पुन्हा पांचसहा दिवसांनी ! कारण आता उशीर झाला आहे फार. परस्परच गेलं पाहिजे मला ! ( जातो. )

( सुशीला गुडघ्यांतून मान वर करून पाहते व शामराव जातांच पुन्हा जोराजोराने रडूं लागते. विमला मात्र मोटार गेली कीं काय, तें पाहण्यास गॅलरींत धावत जाते ! )

---

सप्टेंबर १९२८

## प्रवेश पहिला

( स्थळ— दादर येथील हिंदू कॉलनीमधील एका तिमजली घरांतील एक छोटेखानी खोली. चार खोल्यांच्या फ्लॅटमधील ही खोली पोटभाडेकऱ्याला दिलेली दिसत आहे. खोलीच्या पश्चिमेच्या भिंतीला लागून एक टेबल ठेवलेलें आहे. बाजूच्या दोन भिंतींना टेकून दोन किर्लोस्करी पलंग टाकलेले आहेत. या पलंगां-पैकी एक व्यवस्थित असून दुसऱ्यावर मात्र पातळें, ब्लाउझेस् वगैरे अस्ताव्यस्त पसरलेलीं दिसत आहेत. टेबलाची एक बाजू जितकी नीटनेटकी तितकी दुसरी अव्यवस्थित आहे. व्यवस्थित पलंगावर शांता एका मासिकाचीं पानें वाचीत पडली आहे. इतक्यांत दार ठोठावल्याचा आवाज येतो व शांता चटकन् उठून तें उघडावयास जाते. )

**शांता**— ( दार उघडीत ) ही उषा असेल बहुतेक ! इतक्या जोराने दारावर धक्के देणारं दुसरं कोण असणार आहे ?

( दार उघडतांच उषा प्रवेश करते. शांतेपेक्षा उषा रूपाने फारच सरस आहे. बांधेसूद शरीरयष्टि, तरतरीत चेहरा व चंचल डोळे, ह्यांपेक्षाही तिचा मधुर आवाज व गडबड्या स्वभाव यांनी ती तत्काळ बघणारांच्या मनांत भरते. )

**उषा**— ( हातांतील पुस्तकें आपल्या अव्यवस्थित पलंगावर फेकीत व छत्री दुसऱ्या दिशेला भिरकावीत )—चला, शाळेला तर रामराम ठोकला

आजपासून.

**शांता**— ( आश्चर्यानें ) म्हणजे ?

**उषा**— का ? तुला आश्चर्य कसलं वाटलं त्यांत एवढं ? उद्या सप्टेंबरची पहिली तारीख ना ?

**शांता**— मग ? दिवाळीची सुट्टी ऑक्टोबरपासून ना सुरू होते ? आमचीं एम्. ए. चीं lectures देखील नाही संपलीं इतक्यांत. अन् तुमचीं शाळा ग कशी इतक्यांत बंद होईल ?

**उषा**— ऑक्टोबरची सुट्टी ऑक्टोबरच्या सात तारखेलाच व्हायची सुरू; पण सुट्टीचा पगार लागेल ना द्यावा, म्हणून मिळाली ही आम्हांला नोटीस ३१ ऑगस्टलाच. ही बघ–(हातांतलि कागद तिच्याकडे भिरकावते.)

**शांता**— ( वाचते. ) Miss Usha Gokhale is hereby informed that her services in the Girls' School of the Women's Education Society end on the 30th September 1939. Signed- P. D. Shahane, Secretary, W.E. Society, Dadar. (रागानें) इश्श ! उषे, कसली ग ही नोटीस ! काय भाषा तरी. जरा चांगल्या शब्दांत तरी लिहायची होती त्या सेक्रेटरीनं. काय ही शाळा ! आता तुला इथं दोन वर्षं झालीं नोकरी करायला लागून, अन् सुट्टीच्या पगारासाठी ही नोटीस.

**उषा**— कारण काय तर म्हणे मी S.T.C. नाही. आणि होणार तरी कशी ? दिवसभर शाळेंत शिकवून घसा कसा अगदी कोरडा पडतो. त्या एवढ्याशा इमारतींत आठशे मुली. हवा नाही नी वाऱ्याचं तर नांवही नाही. दिवसभर थकून घरीं यावं, तर वह्या तपासतांना आणि आठवड्याचे पेपर्स वाचतांना जीव अगदी नकोसा होतो. S.T.C. चा अभ्यासतरी

केव्हा करणार आणि कसा करणार ?

**शांता**— तें खरं उषे ! पण या दोन वर्षांत तूं जरा सिनेमा आणि ट्रिप्स बाजूला ठेवून अभ्यास करायला हवा होतास. आताना सहज S.T.C. झाली असतीस. बरं, पण तूं तुझ्या हेड्मिस्ट्रेसला तरी भेटायचं होतंस ! सेक्रेटरीला तरी भेटलीस का ?

**उषा**— सेक्रेटरीला भेटण्यांत अर्थच नाही. त्यांचं संस्थेच्या गरिबीचं पुराण ऐकून माझे कान अगदी किटून गेले आहेत ! आणि हेड्मिस्ट्रेसला भेटण्याची कांही जरूरच नाही. कारण ती नुसती सहीचीच मालकीण आहे !

**शांता**— सुटी संपल्यावर नोव्हेंबरमध्ये तरी तुला नेमतील का परत ?

**उषा**— नेम नाही. पाहिजे तर येऊन भेटा म्हणून सांगितलं सेक्रेटरींनी; पण त्यांच्या वशिल्याची कोणी असली, तर आम्हांला कशाला नेमताहेत !

**शांता**— ( रागाने ) काय ह्या शाळा आणि सोसायट्या ! आणि असल्या शाळांत शिकून म्हणे आमच्या मुली उत्तम नागरिक बनणार ! बरं, मग तूं करणार काय आता, उषे ? दुसऱ्या शाळेंत तरी पहा.

**उषा**— छे गऽ! आगींतून सुटून फुफाट्यांत पडायची माझी इच्छा नाही. मला ह्या सगळ्या भानगडींचा अगदी कंटाळा आला आहे.

**शांता**— कंटाळा येऊन कसं चालेल ?

**उषा**— मी ह्यापुढे नोकरी मागायला जायचं नाही, असंच ठरवलं आहे.

**शांता**— ( आश्चर्याने ) म्हणतेस तरी काय तूं ! दुसरीकडे मिळेल ग. घाबरतेस काय एवढी ?

**उषा**— ( बेफिकीरपणें ) घाबरायचा प्रश्नच नाही.

**शांता**— पण उषे, तुला आपल्या परिस्थितीचाही जरा विचार केला पाहिजे. तुझ्या भावाला आता कुठं पन्नास रुपयांची नोकरी लागली आहे नाशकाला. त्यांत तो तुझ्या भावंडांचं नी आईचं करील कीं तुला पैसे पाठवील ?

**उषा**— पण मी त्याच्याकडं पैसे मागणारच नाही मुळी.

**शांता**— मग करणार तरी काय आहेस तूं उषे ?

**उषा**— ( हसून ) अगदीच साधी आहेस तूं शांते ! अग, आपल्याला बायकांना एवढी नोकरीची परवा करायचं कारण तें काय ? लग्नाचा राजरस्ता सोडून या चाकरी-धर्मांत कोण पडतं ?

**शांता**— ( सुटकेचा निःश्वास टाकून )— आता आलं लक्ष्यांत ! माझ्या मनांत काय नाना कुशंका आल्या पण ! बरं, पण लग्न करायचं कुणाशीं ठरवलं आहेस ? त्या दिवाकराशीं का ?

**उषा**— छट्ट ! त्या दिवाकराशीं लग्न करून का माझा प्रश्न सुटणार आहे ?

**शांता**— कां ? तो कसा देखणा आणि तरुण आहे ! स्वभाव किती गोड आणि अबोल. मोठा करारी आणि धैर्याचा दिसतो, नाही ? लाथ मारील तिथं पाणी काढील ! असा नवरा मिळाल्यावर तुला काळजी करायचं कारणच उरणार नाही—

**उषा**— माझ्यापेक्षा तुलाच तो आवडलेला दिसतो. तूंच कर ना त्याच्याशीं लग्न ?

**शांता**— केलंही असतं. पण त्याचं आहे तुझ्यावर प्रेम. तेव्हा माझ्या आवडीचा काय उपयोग ?

**उषा**— ( वेणीचें टोक बोटाभोवती गुंडाळीत ) प्रेम कसलं आलं आहे ? उगीच आपला मागं हिंडतो झालं !

**शांता**— उषे, असं म्हणूं नकोस. किती तो तुझ्यासाठी झटत असतो. परवा तुला बरं नव्हतं, तर ताबडतोब जाऊन औषध घेऊन आला. तुला करमावं म्हणून गोष्टींचीं पुस्तकंसुद्धा आणलीन्. तुझे पेपर्स तपासायला-सुद्धा तयार होता; आणि इतकं असून किती सभ्य आहे. कधी जास्त-कमी बोलायचा नाही, भलत्या वेळेला यायचा नाही ! बोलणं तरी किती नम्र आणि वागणं तर त्याहून मोहक. खरंच उषे, तुला लग्न करायचं असेल, तर त्याच्याशींच कर. खरोखरच सुखी करील तो तुला.

**उषा**— ( उशीवर डोकें टेकून ) आपलं सर्व म्हणणं खरं आहे, असं जरी धरून चाललं शांताबाई, तरी त्यांत एक मोठी चूक आहे.

**शांता**— कसली चूक ?

**उषा**— ( डोळे मिटून ) दिवाकराजवळ पैसा नाही ! आणि पैशा-शिवाय सुख मिळणं अशक्य आहे, अशी माझी खात्री झाली आहे.

**शांता**— ( अचंब्याने ) उषे, तूंच का बोलते आहेस ही ?

**उषा**— हो ! तूं आहेस ध्येयवादी, पण मी आहें व्यवहारी. पैसेवाल्या लोकांना ध्येयवाद शोभतो. आमच्यासारख्यांना तो परवडत नाही. प्रेमा-साठी गरिबीला कवटाळणाऱ्या श्रीमंत लोकांच्या मुलींच्या गोष्टी मी ऐकल्या आहेत नी वाचल्याही आहेत; पण मला गरिबीची इतकी कांही झळ लागलेली आहे की, ती टाळायला मी वाटेल त्याच्या गळ्यांत माळ घालायला तयार आहें !

**शांता**— थट्टा तर नाही ना करीत तूं उषे ? अग वेडे, पैसा काय केव्हाही मिळेल; पण श्रीमंतीसाठी लग्न करून सुखाला मात्र पारखी

होशील.

**उषा**— तें सर्व मला माहीत आहे. लहानपणीं मी या विषयावर अनेक निबंध लिहिले होते; पण अनुभव आल्यावर मी आपलं मत पार बदललं आहे. बाकी तुला मात्र खूपच shock बसल्यासारखा दिसतो आहे, शांते. पण घाबरूं नकोस अशी. माझ्यासाठी आता एखादा योग्य वर शोधून काढ बघूं.

**शांता**— थांब, मी तुला आणखी एक प्रश्न विचारतें. दिवाकर गरीब आहे, म्हणून तुला कुणी सांगितलं ? बरींच वर्षे आफ्रिकेंत व्यापार करीत होता तो. कांहीच का पैसा नसेल मिळवला त्यानं ?

**उषा**— आता दोन वर्षे तर मुंबईत रिकामाच हिंडतो आहे ना ? मिळवला असेल त्यानं थोडाबहुत पैसा; पण तो किती दिवस पुरणार आहे ? मला खरोखरीचा श्रीमंत म्हणजे अगदी कुबेरासारखा नवरा पाहिजे. इतके दिवस भोगलेल्या गरिबीचं मला पूर्ण उट्टं भरून काढायचं आहे. जन्मांत पुन्हा दारिद्र्याचं नांवदेखील ऐकायला नको; आणि ह्यासाठी थोडाबहुत पैसा मिळविलेला माणूस काय कामाचा ? अगदी पिढीजात श्रीमंत पाहिजे !

**शांता**— असले श्रीमंत म्हणजे म्हातारेच असणार; कारण श्रीमंतांच्या तरुण मुलांच्या हातांतही असा पैसा नसतो आणि शिवाय त्यांचीं लग्नंही लहानपणींच जहागिरदारांच्या मुलींशीं हुंड्यावर झालेलीं असतात. ते काय तुझ्या कामाचे ? पण तूं अजून विचार कर उषे. तूं भारी उतावीळ आणि हट्टी आहेस. निव्वळ श्रीमंतीसाठी एखाद्या म्हाताऱ्या, आपमतलबी किंवा व्यसनी माणसाच्या ताब्यांत जाशील झालं !

**उषा**— कांही जात नाही. उगीच श्रीमंत म्हाताऱ्यांबद्दल लोकांचा

वाईट ग्रह असतो. आता मला तरुण आणि गर्भश्रीमंत असा नवरा मिळणं अशक्यच आहे, हें सोडून दे; पण तुला खरं सांगायचं किनई म्हणजे मला तरुणापेक्षा म्हातारा नवराच अधिक बरा वाटतो. म्हातारपणामुळे तो कसा शांत, शहाणा आणि प्रेमळ बनलेला असतो. बायकोला कशी फुलासारखी वागवतो. तरुण नवरे मोठे अभिमानी नी पुरुषी असतातच नाहीतरी.

**शांता**— तुझ्याशीं वाद घालण्यांत अर्थ नाही म्हणा. तूं कांही आपलं म्हणणं सोडायची नाहीस. ( मनगटावरील घड्याळाकडे पाहून ) अगबाई, साडेपांच वाजले की ? चला, मला सहा वाजतां पोचलं पाहिजे थिएटरांत. उठलंच पाहिजे आता— ( शांता बाथरूमकडे जाते व उषा दुसऱ्या कुशीला तोंड फिरवून निजते. पडदा पडतो. )

---

## प्रवेश दुसरा

( वधूवरसहाय्यक मंडळाचें ऑफिस. ऑफिसांत दोनचार जुनीं कपाटें ठेवलेलीं दिसत आहेत. बाजूच्या भिंतीला टेकून एक टेबल आहे. त्यावर एक फाईल ठेवलेली आहे. जवळच एक गृहस्थ रस्त्याकडे पहात रिकामे उभे आहेत. त्यांनी एक खादीचा अंगरखा घातलेला असून, खादीचीच टोपी चढविली आहे. ऑफिसच्या भिंतींवर मंडळाने घडवून आणलेल्या विवाहप्रसंगांच्या तसबिरा लावलेल्या आहेत. एक शिपाई दारापाशी उभा आहे.

ऑफिसच्या पायऱ्या चढून उषा प्रवेश करते. ती एक रुंद धारीचें सहावारी पातळ नेसलेली आहे. )

**दिवटे**— ( कपाळावरील चष्मा डोळ्यांवर बसवीत ) कोण पाहिजे आहे आपणांला ?

**उषा**— ( टेबलाजवळील रिकाम्या खुर्चीकडे पाहून ) वधूवरसहाय्यक मंडळाच्या मॅनेजरना भेटायचं आहे मला. ( दिवट्यांकडे पाहून ) तुम्हीही विवाहेच्छूच आहांत वाटतं ?

**दिवटे**— ( रागाने टेबलाजवळील खुर्चीवर बसत ) छे–छे–छे. मी तर मंडळाचा सेक्रेटरी आहें. माझं नांव दिवटे. माझं लग्न होऊन आता वीस वर्षं झालीं– सहा मुलं आहेत मला. भलतंच काय ! ( एक क्षण टेबलावरील वस्तु उगीचच हालवतो. नंतर भानावर येऊन ) बरं, बसा आपण. ( उषा बसते. )

**उषा**— ( हसत ) अस्सं ! मॅनेजर आहांत आपण. (त्यांच्या डोळ्यांकडे धिटाईने पहात ) आपलं मंडळ तुल्य वधूवरांचीं लग्नं जमवून आणण्याचं कार्य करीत असतं, हें ऐकून मी आपणांकडे आलें आहें.

**दिवटे**— ( गोंधळलेल्या स्वरांत ) हो–हो– ! हें कार्य आज आम्ही बरींच वर्षं करीत आलों आहोंत. आजपर्यंत आम्ही साठ विधुरांचीं आणि विधवांचीं लग्नं जमवून आणलीं आहेत.

**उषा**— अस्सं ! पण आपण कुमारिकांचीं लग्नं जमवीतच नाही कीं काय ?

**दिवटे**— तसं नाही. पण साधारणपणें कुमारिकांचीं लग्नं त्यांचे पालकच जमवतात; आणि आपल्यासारख्या सुविद्य, सुस्वरूप तरुणी स्वतःच वरयोजना करूं शकतात—

**उषा**— तें जाऊं द्या. मला आपल्या मंडळांत नांव दाखल करायचं आहे. आणि शक्य तितक्या लवकर म्हणजे एका महिन्यांत लग्न जमून

आलं पाहिजे.

**दिवटे**— तसा आम्ही प्रयत्न करूंच; पण–पण आपल्यासारख्या सुस्वरूप सुशिक्षित तरुणीला योग्य असा वर शोधायचा म्हणजे जरा अवधि लागायचा संभव आहे.

**उषा**— कां ?

**दिवटे**— कारण असं की– तुम्हांला मोकळेपणानंच सांगतों– हें पहा, आमच्या मंडळांत नांव दाखल करणारे लोक म्हणजे बहुधा वयस्क, विधुर असे असतात. आपल्यासारख्यांना योग्य असे तरुण—

**उषा**— छे, छे ! चुकीचा ग्रह झालेला दिसतो आहे तुमचा. मला मुळीच तरुणाशीं लग्न करायचं नाही. तुमच्या फायलींत कोणी वयस्क पण अत्यंत श्रीमंत अशा गृहस्थांचं नांव आहे का ?

( दिवटे आश्चर्यानें तिच्याकडे पहातच राहतो. )

**उषा**— ( त्याला जागे करण्यासाठी मोठ्याने ) मग ? आहे का कुणी असा श्रीमंत गृहस्थ ?

( दिवटे भानावर येतात. तिच्याकडे एकदा घाबरून पाहतात व मुकाट्याने समोरची फाइल उघडतात. ती जरा चाळतात व टेबलावरील घंटा वाजवतात. त्याबरोबर ऑफिसांतील शिपाई हजर होतो. इतका वेळ उषेकडे पाहण्यांत तो मॅनेजरचें अस्तित्वही विसरून गेलेला असतो. )

**दिवटे**— अरे, ती नवीन फाईल काढ बरं. ( शिपाई फाईल आणतो. ती उघडून दिवटे पहिल्याच फॉर्मवर दृष्टि खिळवतात. ) हें एक स्थळ आहे, आपण म्हणतां तसं. ( चाचरत ) पण वय बरंच आहे.

**उषा**— हरकत नाही. किती वय आहे ? पासष्ट ?

**दिवटे**— नाही, तितकं नाही. पंचावन्न—

**उषा**— हात्तेच्या, मग कांहीच हरकत नाही. ( अधीरतेने ) हं वाचा बघूं तो फॉर्म.

**दिवटे**— ( चष्मा डोळयांवर सरकवून ) नांव— भिकाजी नारायण कुबेर.

**उषा**— वा, नांव तर कसं शोभण्यासारखं आहे. ऐकतांच या गृहस्थांबद्दल अनुकूल ग्रह होतो.

**दिवटे**— ( वाचूं लागतो. ) — जन्मतारीख १८ जून १८८४. ( तिच्याकडे पाहतो, पण तिच्या चेहऱ्यावर कांही दचकल्याचें चिन्ह न दिसल्याने पुढे वाचूं लागतो. ) द्वितीय विवाह. पूर्व संतति— एक मुलगा, पण आठ वर्षं बेपत्ता.

**उषा**— म्हणजे जवळजवळ संतति नाहीच म्हणाना ?

**दिवटे**— ( वाचतात. ) प्रथम पत्नी कुबेरांच्या तिसाव्या वर्षी निवर्तली. त्या वेळीं मुलाचें वय पांच वर्षांचें होतें. उंची— ५ फूट ८ इंच. वजन— १४० पौंड. प्रकृति— निकोप. वर्ण— गोरा. डोळे— काळे. उत्पन्न— वार्षिक ३०,००० रुपये. शिवाय पिढीजात जहागीर. पेडररोड येथे मालकीचा भव्य बंगला. याशिवाय महाबळेश्वर व पुणें येथे बंगले. मदनपूर येथे पूर्वजांचा जुना सातचौकी वाडा, मालकीचीं गावें व हजार एकर शेतवाडी. व्यसनें—चहा व सुपारी. व्यवसाय— तंबाखूचा व्यापार. Stock Exchange मध्ये ब्रोकर. अनेक इन्शुअरन्स कंपन्यांचे डायरेक्टर व अनेक शाळाकमिट्यांचे मेंबर.

**उषा**—( आनंदाने ) शाळाकमिट्यांचे मेंबर का ? वा, छान. Women's Education Society चे मेंबर आहेत का ?

**दिवटे**— पाहतो हं. ( पाहून ) हो— Vice—President, Women's Education Society.

**उषा**— फारच उत्तम. स्थळ अगदी पसंत आहे मला.

**दिवटे**— थांबा. थोडंसं राहिलं आहे तेवढं वाचतों. ( वाचतो. ) विचार व मतें– सनातनी धर्माचे पुरस्कर्ते. आवडीनिवडी– मुलांची फार आवड. शिशुमंडळ या संस्थेला नुकतीच पांच हजार रुपयांची देणगी दिली आहे.

**उषा**— बस्– पुढे वाचायची जरूरच नाही. स्थळ मला अगदी पसंत आहे. त्यांची नी माझी आता भेट कधी घडवून आणतां तें सांगा.

**दिवटे**— ( गंभीरपणें ) पण स्थळ आपणांस पसंत आहे ना ?

**उषा**— हो–हो. त्याबद्दल तुम्ही शंका बाळगूं नका विनाकारण. आज येईल का भेटतां त्यांना ?

**दिवटे**— आज आहे शनिवार. उद्या रविवार. उद्या नक्की भेटतील. आता फोनवर विचारून ठरवतोंच. बसा आपण तोंवर—

**उषा**— हो– उद्या मी केंव्हाही मोकळी आहें.

( दिवटे आंतील भागांत फोन करावयास जातात. उषा भिंतीवरील फोटो बघत उभी राहते. इतक्यांत रस्त्याच्या दरवाजांतून एक तरुण उषेकडे पहात ऑफिसांत शिरतो. तो बराच उंच आहे. वर्ण मूळचा गोरा असावा, पण किंचित् काळसर झाल्यासारखा दिसत आहे. डोळे काळेभोर, नाक सरळ व केस अत्यंत काळे व कुरळे आहेत. ते नीट न बसविल्याने वाऱ्याने उडत आहेत. त्याने एक साधी पांढरी विजार घातली असून, पांढराच कोट आहे !

**तरुण**— ( उषेजवळ जाऊन ) उषाबाई—

**उषा**— ( मागे वळून पाहते. त्याला पाहतांच ती एकदम दचकते. ) कोण ? दिवाकर ? ( रागाने ) तुम्ही इकडे कसे आलां ?

**दिवाकर**— माफ करा उषाबाई, तुमचा पाठलाग केल्याबद्दल. गेल्या सबंध आठवड्यांत तुमची भेटच झाली नाही. तीनदां तुमच्या घरीं येऊन गेलों पण कुलूप. आताच तिकडे जाऊन आलों, पण कुलूपच

होतं. शांताबाईही घरीं नव्हत्या. म्हणून निराश होऊन परत येत होतों, इतक्यांत या इमारतीकडं सहज लक्ष्य गेलं आणि तुम्ही दिसलांत. म्हणून तसाच आंत शिरलों. आज शाळा नाही खरी—रविवार नाही का ?

**उषा**— नाहीतरी पुढल्या महिन्यापासून शाळेला कायमचीच रजा मिळायची आहे.

**दिवाकर**— कां ?

**उषा**— कालच महिन्याची नोटीस मिळाली मला. ( दिवाकराकडे दुर्लक्ष्य करून ती फोटोंकडे बघूं लागते. दिवाकर तिच्याकडे एकदा पाहतो व सिगरेट पेटवतो. )

**दिवाकर**— मग दुसरीकडं कुठं पाहणार आहांत का नोकरी ?

**उषा**— छे !

**दिवाकर**— ( तिच्याकडे निरखून पहात ) अस्सं ! पण आज इकडं कुठं आलांत तुम्ही ?

**उषा**— ( त्याची नजर चुकवीत ) इकडंच आलें. जरा काम होतं.

**दिवाकर**— वधूवरसहाय्यक मंडळांत ?

**उषा**— हो. काम जवळजवळ झालंच आहे.

**दिवाकर**— तुमच्यासारख्यांना असल्या मंडळांत येण्याची काय जरूर वाटावी ?

**उषा**— कारण आमच्या ओळखीचे कुणी धनवान् कुबेर नाहीत म्हणून.

**दिवाकर**— अस्सं. ही अट आहे वाटतं तुमची ?

( इतक्यांत दिवटे उल्हसित मुद्रेने प्रवेश करतात. त्यांना पाहतांच दिवाकर बाजूला जाऊन उभा राहतो. मधूनमधून तो त्या उभयतांच्याकडे दृष्टि फेकतो. )

**उषा**— भेटले का ते ?

**दिवटे—** हो तर. उद्या सकाळीं नऊ वाजतां त्यांनी आपल्या पेडर-रोडवरील बंगल्यांत आपल्याला बोलावलं आहे. आपला पत्ता दिलांत तर बरं होईल. पावणे नऊ वाजतांच ते आपली गाडी पाठवतील.

**उषा—** ( पत्ता लिहून झाल्यावर ) खरंच, मी नांव लिहायचीही विसरलें की. आपल्याला माझं नांवदेखील ठाऊक नाही.

**दिवटे—** ( दचकून ) खरंच की. मी आपल्याला फॉर्म देतों, तेवढा भरून देतां का ? उगीच आपला एक रिवाज आहे मंडळाचा. ( तो फॉर्म देतो. उषा भरून देते. ) आणि एक रुपया रजिस्ट्रेशनचा.

**उषा—** ( बॅग उघडून ) रुपया का ? (रुपया काढून देते. दिवाकर तें पाहतो.)

**दिवटे—** ( दात दाखवीत ) रिसीट देतों आपणांला. नंतर लग्न जमल्यावर कोणी दहा, वीस अशीं ऐपतीप्रमाणे बक्षिसें देतातच. कमींत कमी दहा रुपये चार्ज आहे; पण बहुतेक हा चार्ज वधूला द्यावा लागत नाहीच. वरच देतो आणि आमचा असा अनुभव आहे की, त्या वेळीं वरराज पैशाकडं पहात नाहीत. चाळीसपन्नासपर्यंतसुद्धा रक्कम मिळते कधीकधी. आता कुबेरांसारख्या स्थळाकडून तर पांचशे रुपयांचाच चेक यायचा. ( दिवाकर चमकून त्यांच्याकडे पाहतो. त्याच्याकडे पाहून ) अहो, श्रीमंत आहेत ते. त्यांना काय पांचशे म्हणजे पांचाच्या जागीं आहेत आज !

**उषा—** ( हसत ) बरी मिळकत होते म्हणायची.

**दिवटे—** आम्हांला स्वतःला काय ती मिळावयाची आहे थोडीच ! वधूवरसहाय्यक मंडळासारख्या लोकोपयोगी कार्याला अशा मदतीची जरूरच आहे आणि म्हणूनच तर आम्ही आतापर्यंत हें कार्य माफक वेतनावर करीत आलों आहोंत.

**उषा**— ( पाय उचलीत ) बरोबर आहे आपलं म्हणणं. बरं, मी जातें आता. फार उपकार झाले आपले. उद्या सकाळीं वाट पाहीन मी गाडीची.

**दिवटे**— हो, हो. गाडी येईलच त्या वेळीं. मी असेनच बरोबर.

**उषा**— जरूर नाही तशी.

**दिवटे**— नाही, पण पहिल्याप्रथम परक्या ठिकाणीं जायचं. रिवाज आहे आमचा. आपली ओळख करून दिल्यावर मग आम्ही पाहिजे तर जाऊं.

**उषा**— ( हसत ) बरं. मी एवढ्याचसाठी म्हटलं की मी कांही तशी एकटी जायला घाबरायची नाही. बरं नमस्कार—( दाराकडे जाऊं लागते. )

( दिवटे नमस्कार करतो; आश्चर्यानें तिच्याकडे पाहतो व पुन्हा टेबलाजवळ जाऊन बसतो. )

**दिवाकर**— ( उषेजवळ जातो. संतापानें तो अगदी लाल झाल्यासारखा दिसत आहे. )— उषाबाई, उद्या तुम्ही तिथं जाऊं नका—

**उषा**— ( त्याच्याकडे पाहते. त्याचा रागीट चेहरा पाहून ती प्रथम लाजते. पण क्षणांतच स्वतःला सावरून घेत ) मी तिथं उद्या जाणार ! तुम्ही कोण मला उपदेश करणारे ?

**दिवाकर**— तुम्हांला माझं ऐकलंच पाहिजे. वेड तर नाही लागलं तुम्हांला ?

**उषा**— ( मिस्किलपणें हसत ) तुम्हांलाच लागलेलं दिसतं आहे. बरं नमस्कार. ( ती झटकन् निघून जाते. दिवाकर तिच्यामागे धावत जातो. दिवटे विस्मयानें पाहतात. पडदा पडतो. )

---

## प्रवेश तिसरा

( **स्थळ**— बाबासाहेब कुबेरांच्या बंगल्याचा दिवाणखाना. पेडररोडवरील श्रीमंत मालकाला शोभेल अशीच त्याची सजावट आहे. उंची कोच मध्यभागीं ठेवलेले असून जमिनीवर जाड, मऊ व शोभिवंत असे इराणी गालिचे पसरलेले आहेत. ठिकठिकाणीं जगांतील सुंदर अशा कोरीव कामाच्या मौल्यवान् वस्तु ठेवलेल्या आहेत. भिंतीवर अनेक प्रख्यात मंडळींचीं छायाचित्रें लावलेलीं आहेत. एका छायाचित्रांत बाबासाहेब कुबेर यांनी गव्हर्नरला दिलेल्या पार्टीचें चित्र आहे.

एका कोचावर उषा बसली आहे. समोरच्या खुर्चीवर वधूवरसहाय्यक मंडळाचे मॅनेजर दिवटे अधिष्ठित झाले आहेत. )

**उषा**— ( मनगटावरील रिस्टवॉचकडे पाहून ) पंधरा मिनिटं झालीं असतील आपल्याला येऊन. त्या शिपायानं निरोप तरी पोचवला असेल का ?

**दिवटे**— ( दिवाणखान्याच्या वैभवाचें निरीक्षण करण्यांत काळवेळाचें भान जाऊन ) आताच तर आलों आपण. बाबासाहेब—

( इतक्यांत दिवाणखान्याच्या डाव्या बाजूकडील दार उघडून बाबासाहेबच प्रवेश करतात. त्यांचा वर्ण गोरा, डोळे तीक्ष्ण व केस रुपेरी असून, चेहऱ्यावरील मंद स्मितावरून ते मोठे उदार व सुस्वभावी असावेत, असा बघणाराचा ग्रह होतो. त्यांना पाहतांच उषा व दिवटे उठतात व नमस्कार करतात. )

**बाबासाहेब**— ( कोचाजवळ जात ) बसा, बसा. माफ करा, आपल्याला मी जरा तिष्ठतच ठेवलं.

**दिवटे**— ( घाबरट स्वरांत ) नाही, तसं कांही नाही. ( उषेकडे बघून ) या उषाबाई—

**बाबा०**— ( आता प्रथमच ते उषेकडे लक्ष्यपूर्वक पाहतात. तिचें तरुण वय, सुंदर स्वरूप व तरतरीत चेहरा पाहून, त्यांना जरा आश्चर्य वाटल्याचें दिसतें. ) आपणच ह्यांना घेऊन आलांत दिवटे ?

**दिवटे**— हो साहेब. काल मी आपल्याला फोन केला होताच—

**बाबा०**— हो. ( उषेकडे पाहून ) आपणांला सर्व हकिगत दिवट्यांनी सांगितली असेलच. त्याशिवाय थोडीशी माहिती सांगणं जरूर आहे, असं मला वाटतं. ( उषा त्यांच्याकडे प्रश्नार्थक नजरेने पाहते. ) ह्या वयांत मी लग्नाच्या फंदांत पडावं, याचं तुम्हांला आश्चर्य वाटण्याचा संभव आहे, उषाबाई. माझा तसा कधीच द्वितीय विवाह करण्याचा उद्देश नव्हता. माझी प्रथम पत्नी माझ्या तिसाव्या वर्षी निवर्तली. त्यानंतर मला सहज लग्न करतां आलं असतं; पण माझा रघुनाथ तेव्हा इथं होता. त्याच्यावरच माझी सारी भिस्त होती. त्याला मी उत्तम प्रकारचं शिक्षण दिलं. विसाव्या वर्षी तो बी. ए. ची परीक्षा फर्स्ट क्लासांत पास झाला. कोणत्याहि बापाला अभिमान वाटावा असाच मुलगा होता माझा; पण काय करणार ? मोठा अभिमानी आणि करारी—

**दिवटे**— आपल्यासारखाच स्वभाव होता म्हणायचा चिरंजीवांचा. साऱ्या मुंबईत आपली कीर्ति आहे या गुणांबद्दल.

**बाबा०**— ( उषेकडे पाहून ) रघुनाथला I.C.S. ला पाठवायचं माझ्या फार मनांत होतं. त्याप्रमाणं मी सर्व तयारी केली. बोटसुद्धा ठरली आणि आयत्या वेळेला हा मुलगा सांगूं लागला की, आपण विलायतेला जाणार नाही ! कारण काय, तर त्याला गांधींच्या सत्याग्रहांत पडायचं होतं. मी फार संतापलों. खूप बोललों त्याला. ( रुमालाने डोळे पुसून ) जरा लागण्या-सारखेच शब्द होते ते. मी त्याला बोललों की, इतके दिवस तुला वाढवला आणि तुझ्यावर वाटेल तसा पैसा खर्च केला, त्याचे चांगले उपकार फेडलेस. असा मुलगा असण्यापेक्षा नसलेला बरा. त्यावरून त्यानं डोक्यांत राख घालून घेतली आणि जो नाहीसा झाला, त्याचा अजून पत्ता नाही !

**उषा**— ( आदराच्या स्वरांत ) मोठे निग्रही आणि तडफदार असले पाहिजेत ते. चौकशी नाही केली त्यांची आपण ?

**बाबा०**— ( किंचित् हसून ) चौकशी ? हजार रुपयांचं बक्षिस लावलं होतं मी. जाहिराती दिल्या, पोलिसांत कळवलं, सर्व कांही केलं, पण ह्याचा कुठंच पत्ता नाही. ( उषा निःश्वास सोडते. ) आठ वर्षे त्याची वाट पाहिली मी. आजपर्यंत आशा धरली की, माझा रघुनाथ येईल; पण आता मात्र खात्री झाली की, त्यानं जिवाचं कांहीतरी बरंवाईट करून घेतलं असावं. तो नाहीसा झाल्यावरच त्याच्यासारखा एक इसम लोणावळ्याला उतरून Tiger's Leap ला गेल्याचं आणि तिथून नाहीसा झाल्याचं वर्तमान मला पोलिसांनी कळवलं; पण त्याचे कपडे किंवा दुसरे कांहीच अवशेष सापडले नव्हते, त्यामुळे मी आपली आशा धरली होती की, तो मनुष्य माझा रघुनाथ नसेल; पण ती आशा व्यर्थच होती. आता आठ वर्षांनंतर माझी खात्री झाली आहे की, तो इसम रघुनाथ होता. एरवी इतके तपास, पोलिसची नजर यांतून तो कुठं आणि कसा पसार होईल ? ( डोकें हातांत दाबून ) कुठून त्या दिवशीं ते शब्द बोलण्याची मला बुद्धि झाली कोण जाणे ! तेव्हापासून मी माझा संतापी स्वभाव सोडून दिला; पण आता काय उपयोग ? माझ्या रघुनाथच्या मरणाला मीच कारण झालों, ही गोष्ट माझ्या मनाला लागून राहिली आहे. मी स्वतःला कधीहि क्षमा करणार नाही, या घोर अपराधाबद्दल ! ( दोनतीन मिनिटें कोणीच बोलत नाही. दुःखावेग असह्य होऊन बाबासाहेब डोकें दाबून बसतात. उषा दुःखित चेहऱ्याने खाली बघत बसते. दिवटे काय करावें तें न सुचून डोळ्यांतील अश्रु उपरण्यांनी पुसत बसतात. इतक्यांत स्वयंपाकी चहाचा ट्रे आणतो व बाबासाहेब आपल्या तंद्रींतून जागे होतात. )

**बाबा०**— ( डोळे पुसून ) माफ करा उषाबाई. मी हा विषय निघाला

की सर्व विसरून जातों. बरं, आता जरा चहा घेऊं या म्हणजे या अप्रिय विषयाचं विस्मरणही होईल. (चहा ओतून पेले देतात व चहा पिऊं लागतात. चहा पितांना कोणीच बोलत नाही. चहा संपल्यावर बाबासाहेब सुपारीचें तबक पुढे करतात.)

**बाबा०**— (सुपारी चघळीत) असो, आता आपण आजच्या विषयाकडे वळूं या. इतके दिवस मी लग्न कां केलं नाही, हें आता आपल्याला कळलं आहेच. इतक्या वर्षांनी आज मी ह्या व्यापांत कां पडत आहे, हें जाणण्याचीही तुम्हांला उत्सुकता असेल. पहिलं कारण असं की, मला आमच्या कुबेर घराण्याचा फार अभिमान आहे. हिंदुस्थानच्या लौकिकांत भर टाकणाऱ्या अनेक व्यक्ति या घराण्यांत जन्माला आल्या. डॉ० धनंजयराव कुबेर यांचं नांव तुम्ही ऐकलं असेलच ?

**दिवटे**— हो तर! अनेक संस्थांना लाखो रुपयांच्या देणग्या देणाऱ्याचं नांव कसं माहीत नसेल ?

**बाबा०**— ते माझे आजोबा. माझे वडील बंधु सिव्हिल सर्व्हिसमध्ये आहेत. प्रांताचे कमिशनर होण्याचा मान मिळविणारे ते पहिले हिंदी गृहस्थ. माझे एक काका म्हणजे सुप्रसिद्ध लेखक व टीकाकार मुकंदराव कुबेर होत. शिल्पकार विनायकराव कुबेर हे माझे दुसरे भाऊ. माझे दुसरे काका लंडनमध्ये प्रिव्ही कौन्सिलर आहेत. आमच्या घराण्यांतील ही बुद्धिमत्तेची ज्योत पुढे चालवायला कोणीतरी पाहिजे. नाहीतर देशाचं अपरिमित नुकसान होईल, अशी माझी खात्री आहे. आता तुम्ही म्हणाल की, देशाची प्रगति एकट्यादुकट्याने होत नसते; पण माझं मत वेगळं आहे. एडिसनसारखा एकच मनुष्य जगांत येऊन ज्या गोष्टी करतो, त्या शेकडो वर्षें हजारो माणसंसुद्धा करूं शकणार नाहीत. आज

माझा रघुनाथ असता, तर त्यानं आमच्या घराण्याच्या बुद्धिमत्तेची ही ज्योत खात्रीनं पुढं चालवली असती; पण दुर्दैवानं तो तर गेला. त्यानंतर लग्न करण्याचं दुसरं कारण असं की, मला स्वतःला मुलांची आवड फार आहे. रघुनाथचीं मुलं मांडीवर खेळवीत बसण्याचं भाग्य नाही खरं. ही अपूर्णता भरून काढण्याची मला तीव्र इच्छा आहे. (उषेकडे पाहून) तुम्हांला पाहतांच मला रघुनाथची आठवण झाली. तो असता, तर माझी सून म्हणून मी खात्रीनं तुमचीच निवड केली असती; पण–पण— तसं होण्याची कांही आता आशा उरली नाही. तुमच्यासारख्या सुस्वरूप, तरुण स्त्रीला माझ्यासारख्या म्हाताऱ्याशीं लग्न करायला सांगायचं, म्हणजे निर्दयपणाचं आहे—

**उषा**— ( आर्जवी स्वरांत ) नाही – नाही. आपण असं वाटून घेऊं नका. आपल्याला पाहतांक्षणींच आपल्याविषयी अत्यंत आदर माझ्या मनांत उत्पन्न झाला. आपलं भाषण ऐकल्यावर तो अधिकच वाढला. आपण माझ्याशीं विवाह करण्याचं कबूल केलं, तर मला अत्यंत आनंद होईल.

**बाबा०**— आदर आणि प्रेम यांत फरक आहे, उषाबाई. मी तुमचा सासरा म्हणून किती छान शोभलों असतों—

**उषा**— ( घाईने ) खरंच सांगतें मी. तरुणाशीं लग्न करण्यापेक्षा प्रौढ गृहस्थाची पत्नी होणंच मला अधिक पसंत आहे. दिवट्यांनासुद्धा–

**दिवटे**— हो साहेब. आमच्या ऑफिसांत येतांच उषाबाईंनी हीच पहिली अट आम्हांला सांगितली की, आपल्याला प्रौढ गृहस्थच पसंत पडतील.

**बाबा०**— ( आश्चर्याने ) अशी अट ठेवण्याचं काय कारण असावं ?

**उषा**— कृपा करून मला आपण हा प्रश्न विचारूं नका; पण मी

आपल्याला अगदी मनापासून सांगतें की, आपल्यासारख्या वराचीच मी वाट पहात होतें; आणि आपण जर निव्वळ माझ्या तारुण्याकडं आणि रूपाकडं पाहून मला नापसंत केलं, तर माझी फार फार निराशा होईल.

**बाबा०**— ( उषेच्या प्रामाणिक डोळयांकडे पाहून ) मी तुम्हांला नापसंत करणं शक्यच नाही. तुमचा प्रामाणिकपणा, मोकळा स्वभाव आणि सरळपणा यांची मला पूर्ण ओळख पटली आहे. तुमच्यासारखी पत्नी मिळाल्यास मी स्वतःस भाग्यवान् समजेन; पण माझ्या स्वार्थासाठी तुमचं नुकसान करण्याची माझी बिलकूल इच्छा नाही.

**उषा**— आपल्याला पुन्हा सांगतें की, आपली पत्नी व्हावं, अशी मला उत्कट इच्छा आहे. आपण नापसंत केलंत, तर मला फार दुःख होईल.

**बाबा०**— मग दिवटे, आमचं लग्न ठरलं, असं समजायला हरकत नाही. तुम्ही मुहूर्तवगैरे पहा आणि सर्व तयारी करा. ( दिवटे पंचांग काढून बघतात. ) काय,

**दिवटे**— ( अत्यानंदाने ) मुहूर्त ना ? पुढल्या रविवारींच आहे—मुहूर्त साहेब. गोरजच आहे. फार सोईस्कर वेळ.

**बाबा०**— ( अडखळत उषेकडे पाहून दिवट्यांस ) इतक्या लौकरचा नको. जरा महिनापंधरा दिवस जाऊं द्यात. उषाबाईनाही निश्चय करायला बरं होईल. खरं कीं नाही उषाबाई ?

**उषा**— मी आपल्या इच्छेच्या बाहेर नाही.

**दिवटे**— ( घाबरट स्वरांत ) छे—छे साहेब. पुढं मग लवकर मुहूर्तही नाही. शिवाय आम्ही लग्न फार दिवस जमवून ठेवूं नये, या मताचे आहोंत. कारण असं—

**उषा**—( उतावीळपणें ) मग नको. रविवारच ठीक आहे. उगीच

कशाला विलंब करायचा ?

**दिवटे**— ( आनंदित स्वरांत ) अगदी रास्त आहे तुमचं म्हणणं.

**उषा**— ( बाबासाहेबांकडे पाहून ) मग ठरवायचा ना रविवारचा मुहूर्त ?

**बाबा०**— ( उषेकडे पाहून ) उषाबाईच्यासाठीच मी उशिरा म्हणत होतों; पण त्याच जर थांबण्याच्या विरुद्ध असतील, तर आमची रविवारला कांहीच हरकत नाही.

**दिवटे**— फार उत्तम. मी सर्व तयारी करतों. बिलकुल काळजी नसावी.

**बाबा०**— ठीक आहे. ( उषेकडे वळून ) बरं, आज जेवायला इथंच राह्यचं.

**उषा**— क्षमा करा, पण साडेदहा वाजतां परत मला गेलंच पाहिजे. माझ्या मैत्रिणीला ही आनंदाची बातमी कधी सांगेन, असं मला झालं आहे.

**बाबा०**— हो, आणि तुमच्या मंडळींची माहिती दिवट्यांनी मला दिली आहेच फोनवर. त्यांनाही कळवलं पाहिजे. दिवटे, त्यांचा पत्ता द्या, म्हणजे मीच पत्र घालीन त्यांना. ( उषेकडे वळून ) आज नाही रहात जेवायला तुम्ही ? बरं, मग संध्याकाळीं कार पाठवीन मी. फिरायला जाऊं reclamation वर.

**उषा**— ( वृद्ध बाबासाहेबांच्या बरोबर एकटें फिरावयास जाण्याची गोष्ट निघतांच दचकते. ) फिरायला ? उद्या सकाळीं आलं तर चालेल ?

**बाबा०**— चालेल. पण आज रविवार आहे. आम्हांला फुरसत असते. उद्या कामाची गर्दी.

**उषा**— ( त्यांना फुरसत नसेल, याचा नकळत आनंद वाटून ) आपण

कामाला जावं—

**बाबा०**— मग तुम्ही काय कराल ?

**उषा**— वाचीत बसेन. नाहीतर बागेंत फिरेन.

**बाबा०**— त्यापेक्षा असं करा, मी घरांत चिंतोपंतांना सांगून ठेवतों. ते तुम्हांला सर्व घरांतली माहिती करून देतील. बरं, मग उद्या सकाळीं आठ वाजतां पाठवतों कार.

**उषा**— आठ म्हणजे फार लवकर होईल. दहा वाजतां—

**बाबा**— उशिरा उठतां वाटतं ?

**उषा**— (ओशाळून) हो. आठ वाजतां उठतें बहुतेक; पण मी आपल्या इच्छेच्या बाहेर नाही—

**बाबा०**— बाप रे. आम्ही पांचाला उठून स्नानवगैरे करून सहलीला जातों, ते आठाच्या आधी परतही येतों. ( उषा घाबरते. ) असो, दहाला पाठवीन गाडी—

**उषा**— ( नमस्कार करून ) बरं, जातें मी—

**बाबा०**— जपून जा हं. बाहेर गाडी आहेच उभी. दिवटे, जपून न्या हं यांना. ( एकदम आठवण होऊन ) पण थांबा, मी जरा आंतून पेढ्यांचा पुडा आणतों— ( आंत जातात. )

( उषा व दिवटे थांबतात. इतक्यांत त्यांचें लक्ष्य बाहेरच्या दरवाजाकडे जातें. घामाने डबडबलेला दिवाकर व धापा टाकणारी शांता आंत शिरतात. )

**उषा**— ( आश्चर्याने ) हें काय ? तुम्ही कसं इकडं आलांत ? ( दिवाकराच्या चेहऱ्याकडे पाहून त्याच्याजवळ धावत जात ) अन् हें काय ? कुठं accident तर नाही ना झाला तुम्हांला ? ( घाबरून त्याच्या कपाळाला हात लावते. )

**दिवाकर**— ( तिचा हात पकडून तिच्या डोळ्यांत पहात ) उषे, बस झालं

तुझं सांग. तुझं माझ्यावर प्रेम आहे कां नाही तें सांग आधी—( उषा लाजते व प्रेमाने त्याच्याकडे पाहते. तो हसतो. ) हो, तुझं माझ्यावरच प्रेम आहे. ( दिवटे स्तंभित होऊन बघत राहतात. ) नाहीतर मला accident झाला, या भीतीने तुझ्या चेहऱ्यांत इतका फरक कां पडावा? चल घरीं. मी तुला हें लग्न करूं देणार नाही.

उषा—( त्याचें बेदरकार तारुण्य व बाबासाहेबांचें हळुवार वार्धक्य यांची तुलना करते व तिच्या चेहऱ्यावर हास्य चमकतें; पण उघड ) तुम्ही हो कोण मला सांगणारे? मी लग्न ठरवलं आहे आणि तें करणार.

शांता—उषे, उषे काय करते आहेस, याची कल्पना तरी आहे का तुला? चल, घरीं चल.

दिवटे—( रागाने दिवाकरास ) काल तुम्ही इथला पत्ता मागायला परत आलांत, तेव्हा मला कल्पनाही नव्हती की, तुम्ही असा प्रकार करणार आहांत म्हणून. आता बाबासाहेबांना मी कसा तोंड दाखवूं—

दिवाकर—वधूवरमंडळानं जमवलेलं एकसष्टावं लग्न मोडेल, म्हणून तुमची घाबरगुंडी वळलेली दिसते. अहो, दुसरं जमवा एखादं लग्न—

दिवटे—( रडकुंडीस येऊन ) दुसरं काय जमवा? अशीं आम्ही जमवलेलीं लग्नं तुम्ही मोडूं लागला, तर काय करावं आम्ही? असं करणं शोभतं का तुम्हांला? कुबेरासारखं स्थळ – आज पांचशे रुपये मिळाले असते मंडळाला—

( इतक्यांत बाबासाहेब हातांत खण, नारळ व पेढ्यांचा पुडा घेऊन प्रवेश करतात. दिवाकरला पाहतांच ते स्तंभित होऊन जागींच उभे राहतात. )

दिवाकर—( पुढे येऊन ) उषे, तुझ्यासाठी मी माझा इतक्या वर्षांचा निश्चय मोडून या घरांत पाऊल टाकलं—

**बाबा०**— (ते शब्द ऐकतांच ते भानावर येतात व धावत येऊन आनंदातिरेकाने दिवाकराला मिठी मारतात.) रघुनाथ, रघुनाथ, मी स्वप्नांत तर नाही ना ?

(सर्व आश्चर्याने त्या दोघांकडे पाहतात.)

**दिवाकर**— (त्यांच्या मिठींतून स्वतःला सोडवीत रागाने) बाबा, तुमच्याविषयी मला जो थोडाबहुत आदर होता, तोही नाहीसा झाला या प्रकारानं. एका तरुण मुलीला—

**बाबा०**— (उषेचा हात दिवाकराच्या हातांत देत,) रघुनाथ, तें सारं सांगतों मग. तुमचा जोडा कसा अगदी लक्ष्मीनारायणासारखा शोभतो; पण इतकीं आठ वर्षे कुठं होतास? घरीं कां आला नाहीस? सगळं सांग पाहूं आधी—

**दिवाकर**— (उषेकडे पाहून मिस्किलपणें) पण ही उषा कुठं माझ्याशीं लग्न करायला तयार आहे! तिला हवा श्रीमंत नवरा—

**बाबा०**— (मोठ्याने हसत) असं होय! मग तर अवश्य तुझ्याशींच तिला लग्न केलं पाहिजे. काय खरं कीं नाही उषाबाई ?—

**उषा**— (लाजून) मी आपल्या इच्छेच्या बाहेर नाही!

(शांता उषेजवळ जाऊन आनंदाने तिचा हात दाबते. दिवटे अजूनही बुचकळ्यांत पडलेले दिसतात. पडदा पडतो.)

---

१४ नोव्हेंबर १९४०

## आमचीं प्रकाशनें

१ **जीवन-प्रकाश**. लेखक- पं० श्री० दा० सातवळेकर, किंमत दोन रुपये.

२ **रातराणीचीं फुलें**. लेखक- श्री० ग० त्र्यं० माडखोलकर, किंमत सव्वा रु.

३ **ज्वाला**. लेखक- श्री० माधव मनोहर, किंमत दीड रुपया.

४ **लोकहितवादींचीं शतपत्रें**. किंमत तीन रुपये.

५ **नव्या-जुन्या**. लेखक- श्री० ना० धों० ताम्हनकर, किंमत दहा आणे.

६ **सती**. लेखक- श्री० साने गुरुजी, एम्. ए., किंमत दीड रुपया.

७ **सात पाहुण्या**. लेखिका-सौ० दया पटवर्धन, एम्. ए., बी. टी., टी. डी., किंमत दीड रुपया.

## आगामी प्रकाशनें

१ **दीप-दान**. लेखिका- प्रो० सौ० कुसुमावती देशपांडे, एम्. ए.

२ **अंतर**. लेखक- राजरत्न वा० वि० जोशी, बडोदें.

३ **त्रिवेणी**. लेखक- श्री० साने गुरुजी, एम्. ए.